






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका



# भाषा आणि जीवन

विव्दत्प्रमाणित त्रैमासिक (Refereed Journal)
मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३७, अंक ४, दिवाळी २०१९

अनुक्रमणिका








## भीमबेटका, मध्य प्रदेश - भारतातील प्राचीन मानवाच्या पाऊलखुणा





हरिभाऊ वाकणकर



अंदाजे ३०,००० **वर्षांपूर्वी, प्राचीन** भारतीय मानवाने **काढलेली चित्रे**





**मराठीतील कोशांच्या प्रदर्शनाला उत्तम प्रतिसाद**


























**मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन**

विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक

**RNI 40048** **ISSN : 2231-4059**

वर्ष ३७, अंक ४, दिवाळी २०१९, ऑक्टोबर-डिसेंबर २०१९

---

## अनुक्रमणिका

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन**

विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक

RNI 40048 ISSN : 2231-4059

**वर्ष ३७, अंक ४, दिवाळी २०१९, ऑक्टोबर-डिसेंबर २०१९**

**संपादक :** आनन्द काटीकर

**कार्यकारी संपादक :** विजय पाध्ये,

**संपादन समिती :**

सलील वाघ, वैशाली कार्लेकर, रमेश पानसे, कलिका मेहता, नीती बडवे

**प्रकाशक, मुद्रक, संपादकीय व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार आणि वर्गणी पाठवण्यासाठी पत्ता -**

आनन्द काटीकर, बी-५/१६, सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे -४११०५१

**संपर्क :** ९४२१६ १०७०४

**ई-पत्ता :** marathi.abhyas.parishad@gmail.com

**मुद्रणस्थळ :** विनायक एन्टरप्रायझेस, ५१७ कसबा पेठ, पुणे ४११०११

**वर्गणीचे दर**

| | व्यक्ती | संस्था |
|---|---|---|
| वार्षिक | १५०/- | २००/- |
| त्रैवार्षिक | ४००/- | ५५०/- |
| पंचवार्षिक | ७००/- | ९००/- |
| आजीव | ५,०००/- | नाही |

सुट्या अंकाची किंमत - रु. ४०/-

**- थेट बँकेत वर्गणी भरण्याची सूचना -**

खातेधारक नाव : मराठी अभ्यास परिषद

खाते क्रमांक : २००५ ७१६ ४२६०

बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र

शाखा : टिळक रस्ता, पुणे

IFSC : MAHB 00 000 41

**वर्गणी भरल्यावर कृपया 94203 22982 किंवा 94216 10704 किंवा 98819 00989 या क्रमांकावर संपूर्ण नाव आणि सविस्तर पत्त्यासह कळवावे.**

**सूचना :** १) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या कोणत्याही लेखाशी, लेखकाच्या मतांशी संपादक किंवा मराठी अभ्यास परिषद सहमत असेलच, असे नाही.

२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे. तथापि या अंकात प्रसिद्ध झालेल्या कोणत्याही लेखाशी, लेखकाच्या मतांशी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आणि महाराष्ट्र शासन सहमत असेलच, असे नाही.

३) मराठी अभ्यास परिषद पत्रिका भाषा आणि जीवन हे विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक आहे. येथे प्रसिद्ध होणारा कोणताही लेख त्या त्या विषयातील तज्ज्ञांच्या अभिप्रायानंतरच प्रकाशित केला जातो. त्यामुळे लेखकांनी लेख पाठवताना प्रकाशनासाठी लागणारा काळ लक्षात घ्यावा, ही विनंती.

**मुखपृष्ठ रचना : सलील वाघ** (प्रकाशचित्रांसाठी सौजन्य आंतरजाल)

संपादकीय

## शास्त्राद् रुढिर्बलीयसी

आनन्द काटीकर

कोणताही समाज हा विविध संकेतांचं पालन करत असतो. या संकेतांचं पालन जसं घरगुती स्तरावर असतं तसंच सामाजिक, कौटुंबिक, सांस्कृतिक अशा विविध स्तरांमध्येदेखील संकेतांचं प्राबल्य असतं, त्यालाच रुढी किंवा परंपरा म्हटलं जातं. आपल्या समाजात ज्या वाईट रुढी किंवा परंपरा आहेत, त्या सुरू होताना कदाचित वाईट नसतात परंतु त्याचा मूळ गाभा हरवला की केवळ आधीच्या पिढीचे अनुकरण आणि तेही अंधानुकरण अशी त्यांची वर्तमान-कालीन अवस्था असते. त्यामुळेच समाजशास्त्रज्ञ 'शास्त्राद् रूढिर्बलीयसी' या म्हणीचा आधार घेताना कायम दिसतात.

'संगीत शारदा' हे नाटक बाला-जरठ विवाह या तत्कालीन प्रचलित रुढीवर आघात करण्यासाठी लिहिलं गेलं, हे आपल्याला माहिती आहे. त्या नाटकाच्या अखेरीस ही रुढी कशी धर्मसंमत नाही हे सांगण्यासाठी शंकराचार्यांना आणलेलं दिसतं. त्यांच्यासमोर वाद-विवाद घडवून ही रुढी नष्ट करायला हवी, अशी त्यांची संमती मिळवून प्रेक्षकांचीही तशी धारणा तयार करण्यास मदत केली जाते. मात्र खरोखरच आपला समाज एखाद्या जाणकाराच्या-तज्ज्ञाच्या मताला पुरेशी किंमत देतो का? त्यांचं म्हणणं ऐकतो का? या प्रश्नांची उत्तरं बऱ्याचदा नकारात्मक असतात. उदाहरणच पाहायचे असेल तर, आज घराघरांत प्रेशरकुकर वापरला जातो. वरण-भात करण्यासाठी किती शिट्ट्या करतात? असं विचारलं तर त्याचं उत्तर एक-दोन-तीन असंच काहीतरी येईल. परंतु शास्त्रीयदृष्ट्या सर्व तज्ज्ञ हे नक्की सांगतील की एकही शिट्टी होऊ देऊ नका, हेच प्रेशर कुकरमागील तत्त्व आहे. परंतु हे तत्त्व फार कमी जण पाळतात आणि विशिष्ट संख्येच्या शिट्ट्या हेच सूत्र पाळून, स्वयंपाकघरे शिळामय होतात. समाजात अशा अनेक रुढी आणि परंपरा प्रचलित असतात, समाजसुधारक त्या नष्ट करण्यासाठी किंवा त्यात सुधारणा करण्यासाठी सातत्याने प्रयत्न करत असतात.

विविध कार्यक्रमांमध्ये अतिथींचं स्वागत हा एक मोठाच वेळखाऊ प्रकार अलीकडे वाढायला लागलेला आहे. त्या स्वागताला सत्कार समारंभ असं चुकीचं नामकरणही केलं जातं. व्यासपीठावर असणाऱ्या प्रत्येकाला आणि प्रेक्षकांमधीलही काही मान्यवरांना व्यासपीठावर बोलावून त्यांचं स्वागत करण्यात अकारण वेळ घालवतात. वास्तविक ज्या कार्यक्रमासाठी सर्वजण उपस्थित झालेले आहेत, त्यांचा जाणारा वेळ, प्रत्यक्ष वक्त्याला मिळणारा वेळ किंवा त्या सादरीकरणाला मिळणारा वेळ, त्यासाठी परिश्रम घेतलेल्यांचा जाणारा वेळ याचं कोणतंही सोयरसुतक आयोजकांना राहात नाही. अगदी लग्नातही वधुवरांपेक्षा अशा मान्यवरांचे सत्कार इतका वेळ चालतात की आलेल्या पाहुण्यांचा वेळ मुख्य लग्नाच्याऐवजी इतरच खाऊन जातात. परिणामी पटत असूनही 'कळतंय पण वळत नाही' अशी अवस्था झालेली दिसते. त्यामुळे कोणत्याही कार्यक्रमाचे आयोजन करताना, त्या कार्यक्रमाचा मुख्य हेतू साध्य करण्यासाठी आखणी करायला हवी, अन्यथा अशा रुढी वाढत राहून मूळ हेतू असफल होऊ लागतो. विविध धर्मांतील कालवश झालेल्या अनेक रुढी आपल्याला माहिती आहेतच. एखाद्या महापुरुषाचे

स्मरण करण्यासाठी फुलं-पुष्पहार यांचाच बडिवार केला जातो आणि त्या महापुरुषांच्या विचारांकडे दुर्लक्ष केले जाते. शासकीय पातळीवरही विविध परिपत्रकं काढून या बडिवाराचाच आग्रह धरला जातो. शैक्षणिक जगतात तर अभ्यास करण्याऐवजी त्या अभ्यासाच्या आभासाला अधिक महत्त्व दिलं जातं आहे की काय, असंच कधीकधी वाटतं. कारण कोणताही प्रकल्प आकर्षक कागदांवर, उत्तम वेष्टणात बंदिस्त होऊन आणि आतील आशय मात्र कुठूनतरी आयात केलेला अशा पद्धतीने सादर होतो. हे सगळं पूर्वापार चालत आलं आहे, म्हणूनच चालवायचं? का त्यामागील कारण जाणून घेऊन त्यात सुधारणा करायची, याचा विचार प्रत्येकानं करायला हवा.

भाषेच्या बाबतीत मात्र एकदम विरुद्ध चित्र असतं. रुढी अतिशय बलवान असतात आणि त्यामुळे बिघडत काहीच नाही. उलट भाषेच्या संदर्भात मूळ शब्दाचा/व्युत्पत्तीचा किंवा अर्थाचा आग्रह धरणं, शास्त्रीय आधार शोधणं हे भाषा-समृद्धीच्या दृष्टीने हानिकारक ठरू शकतं. परोक्ष-अपरोक्ष, दुर्मिळ-दुर्मीळ, छायाचित्र-प्रकाशचित्र (प्रचित्र), काही जातिवाचक म्हणी, काही वाक्प्रचार, काही शब्दांचे मूळ अर्थ बदलून झालेला अर्थविस्तार (कुशल) किंवा अर्थसंकोच (खग = पक्षी), काही शब्दांचा मूळ अर्थ गळून पडून चिकटलेला लाक्षणिक अर्थ (सव्य-अपसव्य) किंवा परभाषेतून आलेल्या शब्दांनी मूळचा अर्थ गमावून धारण केलेला वेगळाच अर्थ (कॉन्व्हेन्ट) यांचंही भान राखावं लागतं. मूळ अर्थ सोडून शब्दांचा होणारा वापर किंवा गैरवापर ही भाषिकदृष्ट्या समाजातील रुढीच्या महत्त्वाच्या स्थानाची निष्पत्ती आहे. इतर रुढी आपण नष्ट करण्याचा प्रयत्न करू शकतो. त्यासाठी कायदा किंवा समाज प्रबोधनाचे मार्ग आहेत. भाषा ही सामाजिक संस्था असल्याने त्यावर सर्व समाजाची मालकी असते. त्यांबाबत प्रबोधन करायला गेल्यास समाज ते मानत नाही, आपलीच भाषा पुढे दामटतो, हेदेखील लक्षात घेणं गरजेचं आहे. त्यामुळे भाषेच्या बाबतीत तरी तयार झालेल्या रुढी स्वीकारूनच पुढं जावं लागतं. त्याचप्रमाणे या रुळलेल्या शब्दप्रयोगांमुळे भाषाही समृद्ध होत असते, हेदेखील लक्षात घ्यावं लागतं. असं का घडतं? हा मात्र भाषावैज्ञानिकांच्या दृष्टीनं अभ्यासाचा विषय असतो. एखादा शब्द ऐकताना झालेली गडबड, उच्चारताना झालेली अडचण, अर्थाचं झालेले चुकीचं आकलन अशा अनेक गोष्टी त्यामागं असू शकतात. थोडक्यात सामाजिक रुढी प्रयत्नपूर्वक दूर होतीलही पण भाषिक रुढी माणसाच्या अंतापर्यंत अस्तित्वात राहतात, असंच दिसून येतं. उदाहरणच सांगायचं तर, आज मराठी समाज छायाप्रतीला झेरॉक्स, वनस्पती तुपाला डालडा, अपरोक्ष म्हणजे दृष्टीआड, प्रकाशकिरणाने चित्र काढले जाते तरीही त्याला छायाचित्र, गोपाळकृष्ण गोखले मार्गाला फर्ग्युसन महाविद्यालय मार्ग असे शब्दप्रयोग सरसकट करताना दिसतो.

त्यामुळे एखादा नवा शब्द किंवा नवीन म्हण रुजवताना आपण काळजीपूर्वक सर्व पैलूंचा विचार करूनच तो शब्द घडवला पाहिजे. अन्यथा डोक्याला हात लावून 'अगं अगं म्हशी, मला कुठे नेशी?' म्हणत पुन्हापुन्हा चुकीच्या रुढींच्या मागे धावायची वेळ आपल्यावर येईल.

मुखपृष्ठ लेख

# अनंतफंदी यांच्या कवनाची भाषा

शिरीष गंधे

यावर्षी सुप्रसिद्ध शाहीर अनंतफंदी यांच्या स्मृतिवर्षाची द्विशताब्दी आहे. १७४४-१८१९ या काळातील, ते एक प्रभावी व्यक्तिमत्त्व होते. अशा या इतिहासप्रसिद्ध कवीने आपल्या मनस्वी स्वभावामुळे लोकप्रियता तर मिळवलीच पण उत्तम धनसंचयही केला. तथापि ह्याच स्वभावामुळे त्यांना टीकाकारांच्या रोषाचे धनी व्हावे लागले. काहींना फंदीची भाषा, वर्णनाचा थाट देसुरी धनगरी वाटतो[१], तर काहींना त्यांच्या रचनेत अश्लिलतेचे दर्शन घडते[२], कुणाला तो पेशवे दरबारचा भाट वाटतो[३]. प्रश्न आहे फंदींच्या भाषेचा. अनंतफंदींनी तरुण वयात जमविलेली मित्रांची मांदियाळी बघितली, की हे कोडेही उलगडू शकते. फंदीच्या रचनेचा गौरव करताना 'गुरव त्याचे सगेसोबती' असे होनाजीने म्हटले आहे. अनंतफंदीनी आपल्या वर्णाचा उल्लेख केलेला नाही. मात्र होनाजीने "फंदी आनंदी, छंदी वरदी... ब्राह्मण त्यावर गुरूकृपा" असे म्हटले आहे आणि हे गुरू कोण? तर नाथपंथातील राऊळ शाखेतील सप्तशृंगी देवीचा साक्षात्कार झालेले उच्चकोटीचे सिद्धपुरुष. पहाटे मोठा त्रिशूळ घेऊन, दोहरा म्हणत भिक्षा मागणारे भिक्षुक, प॰पू॰भवानी शंकर महाराज! ज्या मलकफंदी यांचा उल्लेख अनेक अभ्यासकांनी केला आहे, तो सुफींच्या कलंदर शाखेतील साधू होता. मलक मुस्लिम होता, होनाजी गवळी होता, रतनफंदी, राघवफंदी गुरव होते. गरीब लोकांमध्ये फंदींचा केवळ राबताच नव्हता, तर त्यांच्याविषयीची आस्थाही होती. कुणबी- शेतकरी यांच्या कष्टाचे कौतूक करताना—

"हिमायतीच्या बळे गरीबगुरीबाला तू गुरकावु नको..
... दो दिवसाची जाइल सत्ता अपेश माथा घेउ नको."

किंवा - "शेत कापुनि त्या कुणब्याचे त्याला बिगारी धरतात."

"खेडोपाडी भलताच लुटितो कुणब्याचा जीव उदासला" असे उद्गार ते काढतात, गरिबांविषयीची आत्मीयता दाखवणारे असे अनेक संदर्भ दाखवता येतात. "कष्टाची बरी भाजीभाकरी, तूपसाखरेची चोरी नको." असे सांगताना स्वकष्टाने मिळणारा पैसा हाच योग्य असा संस्कारही अनंतफंदी करतो. कवी नामदेव ढसाळ यांनी जातिअंताच्या लढ्यासाठी लढलेला पहिला साहित्यिक असा पठ्ठे बापूरावांचा गौरव अनेकवार केला असला[४] तरी अनंतफंदींनी याची सुरूवात केली. याविषयात एक कथा सांगितली जाते. एकदा शृंगेरीपीठाचे शंकराचार्य संगमनेरमार्गे जनस्थानी (नाशिक) जाताना, संगमनेरी थांबले असता, तत्कालीन ब्राह्मण समाजाने ब्राह्मण असूनही, घोलपांचा अनंत स्नानसंध्या न करता, छंद-फंद करतो अशी तक्रार शंकराचार्यांकडे केली. तेव्हा संध्येतील २४ नावांची एक लावणी तात्काळ रचून, म्हणून दाखविण्याचे धाडस फंदींनी केले आणि शंकराचार्यांनी कौतुकाने त्यांचे नामकरण 'अनंतफंदी' असे केले. सारांश फंदींना सर्वसामान्य माणूस प्रिय होता, हे त्यांच्या कवनाधारे ठामपणे म्हणता येते. अशा विविध ज्ञातीबांधवांची, धर्मबांधवांची भाषा

फंदींना जवळची वाटली असल्यास नवल नाही. त्याचेच प्रतिबिंब त्यांच्या रचनेत पडलेले पाहावयास मिळते.

प्रमाणभाषा किंवा तिला जवळची असणारी नागरी बोली ही श्रेष्ठ व ग्रामीण बोली ही कनिष्ठ, कमी प्रतीची अशी न्यूनगंडाची भावना ग्रामीण लोकांत आढळते, असा डॉ. रामचंद्र वीर यांचा अभिप्राय आहे.[५] हा श्रेष्ठ-कनिष्ठ विचारही जातीव्यवस्था व वर्णव्यवस्था यातून आलेला आहे. जात, सत्ता व संपत्ती यांच्या बळावर श्रेष्ठ ठरलेल्यांची भाषा श्रेष्ठ व इतरांची कनिष्ठ असे मानले जात असे. आता लोकशाहीच्या युगात सर्वजण समान आहेत. अर्थात शास्त्रीय दृष्टिकोनातून विचार केल्यास, सर्व बोली व भाषा या समान दर्जाच्या आहेत.

बोलींचा प्रभाव प्रमाण भाषेवर पडत असतो. बोली या परिवर्तनशील असतात, त्या हळूहळू पण सातत्याने बदलत असतात. त्यांच्या उच्चारप्रक्रियेत, प्रत्ययप्रक्रियेत, शब्दसंग्रहात सतत बदल होत असतो. पुण्याच्या मध्यवर्ती भाषेपेक्षा संगमनेरी बोलीचे वेगळेपण सर्वप्रथम जाणवते, ते तिच्यातील उच्चारांच्या विशिष्ट लकबीमुळे. येथे नवीन आलेल्या माणसाला हा उच्चार पद्धतीतील वेगळेपणा चटकन जाणवतो, 'तुम्ही इथ्थले दिसत नाय्' असा आपला अंदाज ते व्यक्त करतात[६] विभक्तीप्रत्ययांच्या बाबतीत संगमनेरी बोलीत फारसा वेगळेपणा दिसत नाही. सर्वनामांना लागणाऱ्या काही विभक्ती प्रत्ययांमध्ये थोडा फरक दिसतो. उदाहरणार्थ - 'मी' एकवचन

| प्रथमा | द्वितीया | तृतीया |
| --- | --- | --- |
| मी | मला, माला | म्या, मी इत्यादी |

अनंतफंदी यांच्या कवनांमध्ये; "म्यां म्हटले हा चक रुपया दिसतो..." "म्यां म्हटले हा जुरा शिपाई फाकडा खूप तऱ्हा..." (हे मूर्खा! खूण तर्का लावणी) किंवा ताफा (वाजंत्री), धोदाणा (सूर), पिपाणी (सुंदरी), कडं (हलगी) इ. संगमनेरी बोलीतले अनेक शब्द ते लिहून जातात. "इकडे कडेतोडेवाले तिकडेही तशीच लहज" (फत्तेसिंग गायकवाड पोवाडा) दखनी हिंदी, संस्कृत, फारसी, प्राकृत, संगमनेरी बोलीतील शब्दांच्या संस्कारातून फंदींची भाषा घडली. "सब शेरी, एक संगमनेरी" या वाक्प्रचारातून संगमनेरची अस्मिता दिसून येते. संगमनेर तालुक्यातील बहुसंख्य गावे शेतीप्रधान आहेत. क्वचित इतर जोड व्यवसाय करताना, काही गावे दिसतात. आपण शोध घेतो आहोत फंदींच्या भाषेच्या. ज्या मातीतून तुम्ही चालता, तिथली थोडीतरी धूळ तुमच्या अंगावर पडते, हे मान्य असेल तर फंदींच्या भाषेविषयी प्रश्न पडायला नको. शाहीर अभिजनांचे नव्हे, बहुजनांचे प्रतिनिधी आहेत. बहुजनांत त्यांची उठबस आहे. त्यांच्या सुखदुःखाशी ते समरस झाले आहेत. त्याचाच उद्गार त्यांच्या रचनेत बघावयास मिळतो. संगमनेर आणि परिसर यातील काही गावांची वैशिष्ट्ये अशी - 'अंभोरे' या गावात धनगर समाज मोठा असून, मेंढीचे केस संगमनेर येथे आणून, लोकर तयार करण्यासाठी पाठवतात. 'खरशिंदे' हे डोंगरपायथ्याशी असलेले गाव. याही गावात प्रामुख्याने मराठा, धनगर व मुसलमान समाजाचे लोक राहतात. फंदींचा मित्र मलकचे 'पोखरी गाव' आणि शेजारचे 'कुरण' मुस्लीमबहुल असून

मागासवर्गीयांचीही घरे पुष्कळ आहेत. डोंगरपायथ्याशी निसर्गरम्य वातावरणात वसलेल्या 'डिग्रस' गावात मुख्य व्यवसाय शेतीचा असून, मेंढपाळ हा दुय्यम धंदा आहे. सह्याद्रीच्या कुशीत वसलेल्या 'पानवडी' (पानोडी) गावाशेजारी धनगरांच्या वस्त्या असून, मेंढ्या पाळणे हा त्यांचा प्रमुख व्यवसाय आहे. सीताफळांच्या दाट झाडीत, डोंगरमाथ्यावर वसलेल्या, 'पिंपळगाव माथा' गावात रामोशी, महादेव कोळी, गुरव व हरिजन समाज असून, प्रमुख उद्योग शेती व मेंढपाळ आहे. 'पिंपरी लोकी अझमपूर' हे गाव डोंगराळ भागात वसलेले डोंगराळ भागात वसलेले असून, धनगर, वंजारी समाजाची प्रामुख्याने वस्ती आहे. येथील घोंगड्या कोकण भागात विकल्या जातात. फंदींची भाषा देसुरी-धनगरी का आहे, त्याचे उत्तर यावरून मिळते.

'धन्य तुझे लावण्य'मध्ये "दो मजला पैठणचे पातळ लफाका घे टाचेची खबर।
लाल शालू जशी मशाल घरची खुशाल दोपैशाने गबर।
मांड्या गुडघ्या सरळ पोटऱ्या पायी जोडवी खणाणी।
जसे घोड्याचे नाल वाजती आवाज कानी दणाणी ।।

या वर्णनावरूनही टीकाकारांनी टीकेची तोफ डागलेली दिसते. या वर्णनावरून फंदींची नायिका भलतीच दणकट असावी, असे कुणाला वाटेल. फंदींच्या काळातील वस्त्रविशेष, रंगविशेष, अलंकारविशेष कसे होते? त्या काळची सोळा हात लांबीची आणि चार हात रूंदीची पैठणी, रुंद काठांनी व भल्या मोठ्या पदरांनी अधिक शोभिवंत झाली. ('दोमजला पैठणचे पातळ लफाका घे टाचेची खबर') काठावरचे नक्षीकाम अधिक देखणे होऊ लागले. पदरावरच्या वेलबुट्टया व नयनमनोहर आकारांची गुंफण मराठी महिलांची मने काबीज करू लागली. त्यावेळच्या तिच्या सौंदर्याचे आणि कलात्मकतेचे मोजमाप करण्याऐवजी पैशाची आकडेमोड करणाऱ्या कोण्या एका व्यापाऱ्याने तिचे वजन करून पाहिले. ते थोडथोडके नाही तर चांगले साडेतीन शेर भरले. अशी वजनदार पैठणी दिमाखात नेसणाऱ्या व ती नेसून मिरवणाऱ्या त्यावेळच्या मराठी स्त्रिया किती दणकट होत्या, याचीही खात्री पटेल. विणकरांच्या खालोखाल कसबी कारागीरांचा पैठणीच्या खुलावटीत वाटा होता. हिरवा, पिवळा, लाल व करड कुसुंबी हे पैठणीचे खास रंग आहेत. ('लाल शालू जशी मशाल घरची खुशाल') 'बंजारा स्त्रियांची आभूषणे व सांस्कृतिक संदर्भ' या लेखात सुनंदा पाटील लिहितात- "पागडी हा पितळेचा दागिना असून नागमोडी असतो. पोकळ असलेल्या पागडीत बारीक छिद्रे असतात. त्यामुळे घुंगरापेक्षा वेगळा आवाज चालताना येतो... पोकळ्या हा चांदीचा पोकळ दागिना असतो. ते एका पायात दोन दोन घालतात. त्यामुळे एकमेकांवर आदळून वेगळाच नाद निर्माण होतो. बिचवा हा पायात घालायचा अत्यंत भरगच्च, तीन चार पदरी घुंगरांचा दागिना असतो. अंगुटली पायाच्या अंगठ्यात अंगठीप्रमाणे घालतात. हा चांदी, तांबे, पितळ, लोखंड अशा कोणत्याही धातूचा असतो. तर चटकी अंगठ्यानंतरच्या चार बोटात घालतात. याला बेले किंवा जोडवे म्हणतात, हा सौभाग्य अलंकार आहे.[१] अनंतफंदींनी अशी एखादी प्रमदा पाहिली असावी, तिची चाल, शरीरयष्टी, अलंकारविशेष यातून..."धन्य तुझे लावण्य प्रीतीचे बाण जैसे सणाणी..." या ओळी त्यांना स्फुरल्या

असाव्यात.

संदर्भ -


१. संत कवी तथा शाहीर, य. न. केळकर, पृ.६२

२. साहित्यातील अश्लील आणि ग्राम्य, रा. शं. वाळिंबे, सुविचार प्रकाशन, पुणे नागपूर, पृ.१२५-२६

३. मराठी शाहीर, श्री. म. वर्दे पृ.११४

४. शाहीर पठ्ठे बापूराव नावाचे मिथक, प्रकाश खांडगे, महाराष्ट्र टाइम्स नाशिक, १०.१२.२०१७

५. विस्तारित शब्द रत्नाकर, वा. गो. आपटे/भावे, पृ.५८२

६. संगमनेरी बोली, रामचंद्र वीर, दर्शन स्मरणिका, फेब्रुवारी १९८०, पृ. ९६- १०१.

७. संगमनेर तालुका दर्शन, दर्शन स्मरणिका, फेब्रुवारी १९८०, पृ.१-५४

८. पारंपरिक साड्या, अ. दि. कोकड, समाज शिक्षणमाला, ४७९वे पुष्प, संपादिका- सरोजिनी बाबर, २० ऑगस्ट १९९०, पृ.९/१०

९. मासिक लोकराज्य, जून २००२, अंक पाचवा, पृ.८


**शाहीर अनंतफंदीसंबंधी एक आख्यायिका**

अहिल्याबाई होळकरांच्या आज्ञेनुसार अनंतफंदीने आपला शाहिरी डफ भर सभेत फोडला आणि तमासगिरीचा व्यवसाय सोडून तो अध्यात्माकडे वळला, भक्तिरसाने ओथंबलेली भजने रचू लागला आणि कीर्तनरंगी दंग झाला. पण संगमनेरला त्याच्या गावकऱ्यांनी त्याला गळ घातली की एकदा तरी त्याने डफावर थाप मारून पूर्वीच्या त्याच्या शाहिरी काव्याची मजा लुटण्याची त्यांना संधी द्यावी. 'हो ना, हो ना' करता अनंतफंदीने त्यांची विनंती मान्य केली. त्याच्या शाहिरी संगीताचा आनंद लुटण्यासाठी प्रचंड गर्दी लोटली. योगायोगाने अहिल्याबाई त्याच मार्गाने पुण्यास चालल्या होत्या. 'गर्दी कशाची' म्हणून त्या क्षणभर तेथे थांबल्यावर त्यांना समोर अनंतफंदी दिसला. दोघांची दृष्टादृष्ट झाली आणि मैफलीत एक चमत्कार घडला. लावणीऐवजी अनंतफंदीच्या अभंगाचे सूर निघाले. असा होता अहिल्याबाईचा नैतिक प्रभाव!

- अ०रा० कुलकर्णी

('महाराष्ट्र आणि मराठे' ह्या पुस्तकातील 'साध्वी अहिल्या होळकर' प्रकरणातून)

जन्मशताब्दीनिमित्त

## पुराचित्रांचे 'भीम'संशोधक : पद्मश्री हरिभाऊ वाकणकर

विनीता तेलंग

मानववंशाचा हजारो-लाखो वर्षांचा प्राचीन इतिहास, अश्मयुगापासून घडत आलेली त्याची वाटचाल हा नेहमीच सामान्यजनांच्या कुतूहलाचा व शास्त्रज्ञांच्या संशोधनाचा विषय राहिला आहे. भारतातही मानवाच्या प्राचीन इतिहासाच्या खुणा अनेक ठिकाणी सापडल्या आहेत. प्रमुख भारतीय पुरातत्त्व संशोधकांमध्ये ज्यांचं नाव अतिशय आदरानं जगभर घेतलं जातं, अशा पद्मश्री डॉ॰हरिभाऊ वाकणकर (विष्णु श्रीधर वाकणकर) यांच्या जन्मशताब्दी-निमित्त त्यांनी केलेल्या प्रचंड कार्याचा आढावा घेणं आवश्यक आहे.

हरिभाऊंचा जन्म मध्यप्रदेशातील मंदसौर जिल्हयातील निमच या गावात, ४ मे, १९१९ सालचा. वाकणकर परिवाराचा आठ पिढ्यांचा इतिहास उज्जैनमध्ये उपलब्ध आहे. आर्थिक स्थिती सधन नसली तरी समाज व राष्ट्राप्रति प्रेम या घराण्यात फार आधीपासून आहे. चित्रकला व इतिहास या विषयांच्या विशेष आवडींमुळे त्यांनी शालेय शिक्षणानंतर प्रथम मुंबईला जी॰डी॰आर्टस् व नंतर उज्जैनला विक्रमशिला विद्यापीठात शिक्षण घेतले. उच्च शिक्षणानंतरही योग्य नोकरी न मिळाल्यामुळं उज्जैनमध्येच त्यांनी एक आर्ट सेंटर चालवलं. मग काही काळ मुंबईला एका वस्तुसंग्रहालयात नोकरी केली. नंतर ते उज्जैनलाच विक्रमशिला महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. त्यांना मुळात असलेली इतिहास व पुरातत्त्व शाखांची आवड त्यांना स्वतंत्र संशोधनासाठी खुणावत होती. चंबळ व नर्मदा खोऱ्याचं सर्वेक्षण, नावडातिलि (१९५५), महेश्वर (१९५४), इंग्लंड (१९५९), पनोटी आवरा (१९६०), कायथा, मंदसोर, दांगवाडा इ. पुरातत्त्वीय संशोधनांमध्येही हरिभाऊंचा मोठा वाटा होता. इंग्लंड व फ्रान्समधील उत्खनन कामांतही त्यांनी भाग घेतला. एकूण २५०हून अधिक संशोधन निबंध आणि अनेक पुस्तकं त्यांच्या नावावर आहेत.

कालिदासाने मेघदूताची रचना ज्या ठिकाणी केली त्या रामगढ या ठिकाणाचा (रामगिरी पर्वत) संशोधनपर अभ्यास व्हावा व तेच हे ठिकाण आहे, हे सिद्ध करता यावे या हेतूने हरिभाऊंनी तिथे जाऊन त्या परिसराचा अभ्यास सुरू केला. तिथे त्यांना आश्चर्यकारक खुणा सापडल्या. रामगिरी पर्वतावर त्यांना स्वच्छ पाण्याचे सरोवर आढळले. हरिभाऊंनी तो सारा परिसर व डोंगर पालथा घातला. रामगिरीच्या पायथ्याशी त्यांना एक गुहा आढळली. तिच्या डाव्या बाजूवर ‘मेघदूत’ असं खोदलेलं आढळलं. तर उजवीकडे ‘सुतनुका’ असं लिहिलं होतं. तसंच आत वर चढत गेल्यावर एका जागी ‘कालिदासम्’ अशी अक्षरं खोदलेली सापडली. यावरून त्यांनी कयास केला की याच ठिकाणी मेघदूत लिहिलं गेलं असावं. कालांतरानं अधिक संशोधनानंतर कालिदासानं वर्णन केलेली भौगोलिक स्थिती, हवामान, मार्ग या साऱ्याचा अभ्यास होऊन हेच ते स्थान यावर संशोधकांनी शिक्कामोर्तब केलं.





अनुक्रमणिका

उज्जैनजवळ दंतेवाडा गावात सुरू असलेल्या उत्खननात देखील त्यांनी प्रचंड परिश्रम केले. त्यादरम्यान त्यांचा मध्यप्रदेशात सतत प्रवास सुरू असे. १९५८ साली भोपाळ ते इटारसी प्रवासात बाहेर दिसणाऱ्या डोंगरांचं निरीक्षण करताना त्यात त्यांना काही गुहासदृश पोकळ्या दिसून आल्या. सहप्रवाशांना विचारलं असता त्या जागेला 'भीमबैठका' (भीम बसत असे ती जागा) म्हणतात, अशी माहिती मिळाली. हरिभाऊंची उत्सुकता त्यांना स्वस्थ बसू देईना. तिथे जाण्यासाठी कोणताच अन्य मार्ग नाही व वन्य प्राण्यांच्या भीतीनं आजवर तिथं कुणीही गेलेलं नाही, अशी माहिती मिळाल्यावर त्यांनी तिथेच उतरायचा निर्णय घेतला. पुढील स्थानकाकरता गाडीचा वेग मंदावताच त्यांनी गाडीतून उडी मारली व ते त्या डोंगरांच्या दिशेनं निघाले. खूप पायपीट केल्यानंतर त्या पोकळ्यांपर्यंत ते पोचू शकले. भोपाळच्या दक्षिणेला रायसेन जिल्ह्यातलं भीमबेटका हे अज्ञात ठिकाण मानववंशाच्या इतिहासाच्या किती महत्त्वाच्या खुणा सांभाळतं आहे, हे तोवर कुणालाच ज्ञात नव्हतं. हरिभाऊ तिथे गेले तेव्हा त्यांना लक्षात आलं की या पोकळ्या म्हणजे प्राचीन गुहा आहेत. कोणत्याही सोयीसुविधा नसण्याच्या काळातही ते सलग पंधरा वर्षं तिथं जात राहिले. अभ्यास व संशोधन करत राहिले. त्यावेळी त्या जंगलात भोजनाची काही व्यवस्था होणं शक्यच नव्हतं. हरिभाऊ सोबत बटाटे घेऊन जात. ते तिथे पोचताच वाळूत पुरून ठेवत व काम करत रहात. काही वेळानंतर ते वाळूतल्या उष्णतेमुळं आपोआप भाजले जात. त्यावर त्यांची गुजराण होई. त्या परिसराचा इतिहास उजेडात आणण्याकरता त्यांनी अतिशय खडतर परिश्रम घेतले. त्या गुहांमध्ये त्यांना भिंतींवर, छतावर रंगवलेली प्राचीन चित्रं आढळली. वनस्पतीजन्य वा खनिज रंगात रंगवलेल्या चित्रांचा अक्षरशः खजिनाच त्या गुहांमध्ये त्यांना सापडला. विंध्यपर्वताच्या कुशीत, घनदाट जंगलातील सात डोंगरांमध्ये विखुरलेल्या साडेसातशे गुहांमधल्या पाचशेच्या वर गुहांमध्ये चित्रं होती. चित्रं प्रामुख्यानं लाल व पांढऱ्या रंगात रंगवलेली होती. काही ठिकाणी हिरव्या व लाल रंगांचे ठिपके होते. चित्रांत शिकारीचे प्रसंग होते. त्यात भाला, काठी अशी अवजारं आणि वाघ, हरीण, घोडे, हत्ती असे प्राणीही चित्रित केलेले होते. काही धार्मिक म्हणावीत अशी चिन्हं, समूहनृत्यं व अन्य काही व्यवहारदेखील चित्रांत दिसत होते. मानवी जीवनाच्या विकासाचा जणू आरंभ-बिंदूच या चित्रांमध्ये नांदत होता. त्याचं पुरातत्त्वीय महत्त्व लक्षात घेऊन त्यांनी ती गुहाचित्रं प्रकाशात आणण्याचं ठरवलं. हरिभाऊ स्वतः अतिशय उत्तम चित्रकार होते. त्यांनी चित्रकलेच्या काही विद्यार्थ्यांना सोबत घेऊन त्या गुहाचित्रांच्या प्रतिकृती बनवल्या. परंतु याचं रीतसर संशोधन होणं गरजेचं आहे, हे ध्यानात घेऊन त्यांनी त्यांचे मार्गदर्शक प्राध्यापक प्रा. सांकलिया (ज्यांनी रामायणाची काळ निश्चिती केली) यांच्या मार्गदर्शनाखाली या गुहाचित्रांवर पीएच०डी० पूर्ण केली. भारतीय पुरातत्त्व खात्यानं ऑगस्ट १९९० मध्ये भीमबेटका राष्ट्रीय वारसा स्थळ घोषित केलं. कार्बन डेटिंग पद्धतीनं या गुहांचा व चित्रांचा काळ शोधला असता ते शैलाश्रय अश्मयुगीन असल्याचं लक्षात आलं. त्या परिसरात आजूबाजूच्या २१ खेड्यांमध्ये अनेक अवशेष विखुरले आहेत. त्यात काही किल्ल्यांच्या भिंती, लघुस्तूप, पाषाण-भवने, गुप्तकालीन अभिलेख, परमारकालीन मंदिरांचे अवशेष असा

पाषाणयुगापासून ते ज्ञात ऐतिहासिक काळापर्यंतचा मानवइतिहासाचा मोठा आलेख सापडला. फ्रान्समध्ये भरलेल्या पुरातत्त्व शास्त्रज्ञांच्या परिषदेत त्यांनी सर्वप्रथम आपलं संशोधन व त्या चित्रांच्या प्रतिकृती सादर केल्या. युरोप-अमेरिकेतही अनेक ठिकाणी या चित्रांची प्रदर्शनं व त्याला जोडून व्याख्यानं असे अनेक कार्यक्रम हरिभाऊंनी केले. रीतसर संशोधन प्रक्रियेनंतर युनेस्कोने त्यांच्या संशोधनाला मान्यता दिली व भारतातील भीमबेटका हे जागतिक वारसा स्थळ म्हणून घोषित केलं. या अभ्यासावर रॉक आर्ट ऑफ भीमबेटका हे पुस्तक त्यांनी ऑस्ट्रेलियन अभ्यासक लोथार वँक (Lothar Wanke) यांच्या सहकार्यानं लिहिलं.

अजून एक रोचक सत्य उजेडात येण्यासाठी हरिभाऊ कारणीभूत ठरले. लंडनमधील वस्तुसंग्रहालय पाहताना त्यांना राजा भोज याच्या दरबारात असलेली सरस्वतीची मूर्ती दिसली. हरिभाऊ त्या मूर्तीचं बारकाईनं निरीक्षण करण्यात गुंतले. त्यांच्या लक्षात आलं की मुस्लीम आक्रमणात क्षतिग्रस्त झालेली हीच ती मूर्ती. त्याच ठिकाणचे रहिवासी असलेले हरिभाऊ सारा इतिहास आठवून भावुक झाले. दुसऱ्या दिवशी ते पुन्हा एक फूल घेऊन गेले. ते वाहून नमस्कार करताना पाहून तिथल्या प्रमुखानं त्यांची चौकशी केली. हरिभाऊंची ओळख पटताच त्यानं स्वतःहून त्यांना एका खास दालनात नेलं. तिथं फक्त संशोधकांना प्रवेश होता. त्या खोलीत अनेक डायऱ्या होत्या. भारताला भेट दिलेल्या प्रवाशांच्या या नोंदी आहेत असं त्यानं सांगितलं. हरिभाऊंना त्यात चक्क 'वास्को डि गामा'ची रोजनिशी मिळाली. त्यात त्यानं भारताच्या सुवर्णभूमीचा शोध घ्यावा असं का वाटलं, तिथं जाण्यात कुणी मदत केली, कसा मार्ग शोधला वगैरे बाबी नोंदल्या होत्या. त्या नोंदींवरून, वास्को डि गामाला मार्ग दाखवणारा एक भारतीय व्यापारीच होता. तो स्वतःचे जहाज घेऊन नियमित व्यापार करत असे, हा शोध लागला.

भारताचं अस्तित्व व इथली संस्कृती प्राचीनतम आहे हे सप्रमाण सिद्ध करण्यात हरिभाऊंचं खूप मोठं योगदान आहे. आर्य-द्रविड आक्रमण सिद्धान्तही खोटा व दूषित असल्याचं हरिभाऊंनी ग्रंथ लिहून सप्रमाण सिद्ध केलं. सरस्वती नदीचं स्थान भारतीय संस्कृतीत मोलाचं आहे. ऋग्वेदांतील ऋचांमध्ये देखील 'अंबीतमे, नदीतमे, देवीतमे सरस्वती' अन्नवती, उदकवती असे तिचे उल्लेख आहेत. सरस्वती व तिचं लुप्त होणं हे मिथक नसून ऐतिहासिक व भौगोलिक सत्य आहे, हे सिद्ध करण्याकरता अनेक देशी विदेशी संशोधकांनी काही काम केलं होतं. या सर्वांचा आधार घेत हे काम पुढं न्यावं, याकरता मोरोपंत पिंगळे यांच्या सूचनेनुसार १० फेब्रु. १९८३ रोजी कुरुक्षेत्र येथे एक चर्चासत्र आयोजित केलं होतं. त्यात 'सरस्वती नदी अध्ययन केंद्रा'ची स्थापना झाली. या समितीचे संयोजक म्हणून हरिभाऊंची नियुक्ती झाली. हरिभाऊंच्या 'सरस्वती नदी शोध अभियान' या संशोधन प्रकल्पातून सरस्वतीचा प्रवाह, तिच्या काठची संस्कृती, याचा शोध घेणं सुरू झालं. या प्रकल्पाचं महत्त्व लक्षात घेऊन सरस्वती नदीचा मार्ग शोधण्याकरता इस्रोनं सहाय्य केलं. आदिबिद्री या सध्या पाकिस्तानात असलेल्या सिंध प्रांतापासून, कच्छ व गुजरातच्या रणांमधून असा जवळजवळ चार हजार किलोमीटरचा प्रदेश हरिभाऊंच्या

चमूनं पालथा घातला. पुरातत्त्व शास्त्रज्ञ, भूवैज्ञानिक, हिमालय अभ्यासक, तज्ज्ञ छायाचित्रकार, लोककला अभ्यासक यांचा समावेश या चमूत होता. या यात्रेत त्यांनी अनेक अवशेष एकत्र केले व उज्जैन विद्यापीठासमोर ठेवले. तिथून सरस्वती नदीवरील संशोधन प्रकल्पांना अधिक गती मिळाली.

हरिभाऊंच्या आयुष्यात, संशोधनासोबत सामाजिक कार्यातील सक्रिय सहभागाचा प्रवाहदेखील तितक्याच ठळकपणे वाहात होता. तारुण्यात स्वातंत्र्यसैनिक असलेल्या हरिभाऊंनी नंतर रा०स्व०संघाचे प्रचारक म्हणून व काही काळ अ०भा० विद्यार्थी परिषदेचे मध्यप्रदेश प्रांताचे अध्यक्ष म्हणून काम केलं. १९६६ साली प्रयाग येथे झालेल्या विश्व हिंदू संमेलनाकरता एकनाथजी रानडे यांच्या विनंतीनुसार प्रदर्शनी विभाग सांभाळण्याकरता ते गेले. त्यांची कलासक्त वृत्ती व सौंदर्यदृष्टी याचा पुरेपूर वापर त्यांनी संमेलनात केला. त्यानंतर अशा मोठ्या संमेलनांत त्यांची ती जबाबदारीच होऊन गेली. त्यांनी भारतीय संस्कृती, कला व इतिहास या विषयावर व्याख्याने देत देशविदेशात भरपूर प्रवास केला. १९८१ साली 'सा कला या विमुक्तये' अर्थात 'कला तीच जी बंधमुक्त करते' हा विचार घेऊन ललितकलाक्षेत्रात काम करणारी 'संस्कार भारती' ही संघटना सुरू झाली. तिचे संस्थापक महामंत्री म्हणूनही हरिभाऊंनी काम पाहिले. काही काळ ते संघाचे प्रांत बौद्धिक प्रमुखही होते. संघाशी असलेली आपली बांधिलकी त्यांनी कधीच लपवली नाही. त्यांच्या पीएच०डी०च्या प्रबंध सादरीकरणाच्या वेळी समितीतील एका सदस्याने त्यांना सांगितले, "तुमच्या प्रबंधातील संघाचा उल्लेख तेवढा काढून टाका". त्यावर ते उत्तरले, "तुम्ही मला पीएच०डी० दिली नाहीत तरी हरकत नाही. पण माझ्या संपूर्ण संशोधनात मला साह्यभूत झालेल्या माझ्या संघबंधूंचं ऋण मी कसं नाकारू?"

पुरातत्त्वशास्त्राच्या दृष्टीनं भारतातील उत्खननात सापडलेल्या वस्तू, इंग्लंड वा फ्रान्समध्ये मिळालेल्या वस्तूंपेक्षा कितीतरी मौल्यवान आहेत. परंतु आपल्या देशात सरकारला वा सामान्य माणसाला या संशोधनाचं महत्त्व कळत नाही. आजूबाजूचे रहिवासीही अशा ठिकाणांचं नीट जतन करत नाहीत. भीमबेटका जगप्रसिद्ध झाल्यानंतरही सरकारला त्याची फारशी जाण नव्हती. एकदा एक जपानी संशोधकांचा चमू भीमबेटका शोधत भारतात आला. सरकारी खात्यात चौकशी केल्यावर त्यांना 'अशी काही जागा इथं नाही' असं उत्तर मिळालं होतं. सरकार हरिभाऊंना संशोधनाकरता आर्थिक साहाय्य करत होतं, वर्षाला अवघे दहा हजार रुपये! त्याचवेळी अमेरिकेतून आलेल्या एका विद्यार्थिनीला प्रवासखर्चाव्यतिरिक्त दीड लाख रुपये अनुदान मिळत होतं. "मी तहानभूक विसरून उपाशीपोटी संशोधन करावं अशी सरकारची अपेक्षा आहे!" असं ते गंमतीनं म्हणत. पण असल्या अडचणींनी ते कधीच थांबले नाहीत. संशोधनाची अनिवार ऊर्मी व गरजा कमीतकमी ठेवून काम करण्याची वृत्ती यामुळं त्यांच्या हातून पर्वतप्राय काम उभं राहिलं.

भारत कला भवन, ललित कला संस्था, शैलाश्रय कला संस्था, विक्रम विद्यापीठ, उज्जैनचा उत्खनन विभाग यांचे संचालक, इतिहास संकलन समिती मध्यप्रदेश व गुजराथचे अध्यक्ष, अशा अनेक मार्गांनी त्याचं काम अव्याहत सुरू होतं. त्यांना संशोधनाकरता





अनुक्रमणिका

दोराबजी टाटा ट्रस्टचं अनुदान मिळालं होतं. १९६१ ते ६३ या काळात फ्रान्स सरकारची शिष्यवृत्तीदेखील त्यांना मिळाली होती. हरिभाऊंची राहणी अत्यंत साधी होती. पॅरिसमधील मुक्कामात ते हाताने स्वयंपाक करून जेवत. त्यांच्या मौलिक संशोधनाबद्दल १९७५साली त्यांना भारत सरकारनं पद्मश्री देऊन गौरवलं. "कदाचित आपणच दिलेल्या पद्मश्रीची आठवण झाल्यामुळं असेल, पण आणीबाणीत मला सरकारनं मुळीच हात लावला नाही." असंही ते गंमतीनं म्हणत. अर्थात तत्कालीन पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांना हरिभाऊंच्या कार्याबद्दल आदर होता. हरिभाऊ त्यांच्याशी थेट संपर्क साधू शकत होते.

हरिभाऊंच्या स्मरणार्थ, २००५-०६ पासून, भारत सरकार 'संचालनालय पुरातत्त्व अभिलेखागार व संग्रहालय' यांच्या वतीनं पुरासंपदा संरक्षण व पुरातत्त्विक संस्कृती रक्षणाच्या क्षेत्रात रचनात्मक व सृजनात्मक, विशेष उल्लेखनीय कार्य करणाऱ्या एका व्यक्तीस दरवर्षी 'डॉक्टर विष्णु श्रीधर वाकणकर सन्मान पुरस्कार' दिला जातो. दोन लाख रुपये व सन्मानपत्र असं याचं स्वरूप आहे. असा हा खंदा पुरातत्त्व संशोधक नि सच्चा कार्यकर्ता, मनानं सदैव कलेच्या जवळ होता. संधी व वेळ मिळेल तेव्हा हातात पेन्सिल, कुंचला घेऊन चित्रं काढण्यात ते रममाण होत.

१९८८ साली सिंगापूरला एका हिंदू संमेलनानिमित्त हरिभाऊ गेले होते. तिथल्या हॉटेलच्या गॅलरीत बसून ते समोर दिसणारं निसर्गचित्र रेखाटत होते. त्यांच्या ४ एप्रिलच्या नियोजित कार्यक्रमाला ते गेले नाहीत, म्हटल्यावर त्यांचा शोध सुरू झाला. हातातली पेन्सिल खाली पडलेली व मांडीवर अर्धवट काढलेलं समुद्राचं चित्र अशा स्थितीत ते गॅलरीत आढळले. ३ एप्रिललाच या सरस्वतीच्या संशोधकानं सरस्वतीच्या सेवेत अखेरचा श्वास घेतला.

हरिभाऊंना धड सत्तर वर्षांचं आयुष्यही मिळालं नाही. पण त्यांचे अथक परिश्रम, सातत्यानं संशोधन करत एकेक प्रकल्प पूर्ण करण्याची चिकाटी, त्याचं शास्त्रशुद्ध दस्तऐवजीकरण करणं, दुसऱ्या बाजूनं विविध सामाजिक जबाबदाऱ्या उत्तमपणे पार पाडण्यासाठी वेळ देणं, हे सारं पाहिलं की एकाच आयुष्यात ते किमान दोन आयुष्यं जगले असं वाटतं. या साऱ्या प्रवासात अपार कष्ट करत असताना त्यांची खेळकर वृत्ती अन सौंदर्यदृष्टी कधीही मालवली नाही. भारताच्या प्राचीन सांस्कृतिक, ऐतिहासिक, वैदिक वारशाचा केवळ उदो उदो न करता रीतसर संशोधन करून सरस्वतीप्रमाणं लुप्त झालेला तो ज्ञानाचा प्रवाह पुन्हा वाहता करणं व अखिल जगताला त्याचा लाभ करून देणं, ही काळाची गरज आहे व तीच हरिभाऊंना खरी आदरांजली असेल.

---

https://shabdakosh.marathi.gov.in/ ह्या दुव्यावरून आपल्याला महाराष्ट्र शासनाच्या भाषा संचालनालयातर्फे तसेच मराठी विश्वकोशात प्रसिद्ध करण्यात आलेल्या सर्व पारिभाषिक संज्ञाकोशांमधून व शब्दकोशांमधून देण्यात आलेल्या नोंदी एका चुटकीसरशी पाहता येतात. हा शासनाचा एक चांगला उपक्रम आहे. सर्वांनी त्याचा लाभ घ्यायला हवा.





अनुक्रमणिका

लेख

## वाचकाची परिमिती

नीती बडवे

आपल्याला माहीत आहे की कोणतीही वापरातली भाषा आपण ऐकत, वाचत, बोलत आणि लिहित असतो. लहान बाळ ध्वनी ऐकतं आणि मग ते उच्चारण्याचा प्रयत्न करतं. लहान मूल प्रथम अक्षरं बघतं आणि त्याप्रमाणे अक्षर काढण्याचा प्रयत्न करतं.

एखादी नवीन भाषा शिकताना आपण त्या भाषेत ऐकणं आणि वाचणं, तसंच बोलणं आणि लिहिणं ही चार कौशल्यं अवगत करून घेतो. त्यात नैपुण्य मिळवतो. ऐकणं आणि वाचणं ही आकलन किंवा ग्रहण करण्यासाठी लागणारी कौशल्यं आहेत. बोलणं आणि लिहिणं ही अभिव्यक्तीसाठी लागणारी म्हणजेच निर्मिती-कौशल्यं आहेत. भाषिक कौशल्यांमध्ये ग्रहण-आकलन कौशल्यं महत्त्वाची आहेत.

प्रस्तुत लेखाचा विषय आहे 'वाचक'. 'वाचका'बद्दल सर्वसाधारणपणे फार कमी बोललं किंवा लिहिलं जातं. ह्या लेखात १९६०नंतरच्या दशकांत 'वाचन' आणि 'वाचक' याबद्दल युरोपात मांडल्या गेलेल्या काही विचारांचा थोडक्यात परामर्श घेतला आहे.

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या दशकात बहुतांश वसाहती स्वतंत्र झाल्या आणि युरोपीय देश स्थिरस्थावर होऊ लागले. त्यावेळी मानव्यशास्त्रांमध्ये अनेक विचारप्रणालींचा (इझम्स) उदय आणि प्रसार झाला; तरंच अनेक विषयांवर नवीन सिद्धान्त मांडले गेले. त्यामध्ये समाजशास्त्रीय, भाषाशास्त्रीय आणि संज्ञापनशास्त्रीय (कम्युनिकेशन सायन्स) सिद्धान्तनही मोडतं. त्या काळात चर्चा केल्या गेलेल्या अनेक कलाटण्यांपैकी (टर्न्स) सामाजिक (सोसिऑलॉजिकल) आणि भाषिक (लिन्ग्विस्टिक) कलाटण्यांनी एक नवीन वाट दाखवली. ह्या नव्या विचारांचा साहित्यशास्त्रावर बराच परिणाम झाला. आत्तापर्यंत सर्वसाधारणपणे साहित्याचं विश्लेषण आणि समीक्षा ही लेखक-केंद्रित किंवा लेखक-प्रधान असायची. लेखक कोण आहे, त्याची पार्श्वभूमी काय आहे, हे महत्त्वाचे प्रश्न असायचे. लेखकाचा जीवनपट, त्याची जडण-घडण ह्यांना महत्त्व दिलं जायचं. लेखकाला काय म्हणायचं आहे, हा प्रमुख मुद्दा असायचा. कधी कधी लेखकाच्या पुस्तकांपेक्षा त्या लेखकाचाच दबदबा अधिक असायचा.

पण हळूहळू काही रशियन, जर्मन आणि फ्रेंच समाजशास्त्रज्ञ, भाषावैज्ञानिक आणि संस्कृतीशास्त्राचे तज्ज्ञ विचारू लागले, की वाङ्मयीन आणि अवाङ्मयीन पाठ्य ह्याचे निकष काय? साहित्याकडे लेखकाच्या दृष्टिकोनातून का बघितलं जातं? मोठ्या साहित्यकृतीला एका व्यक्तीपेक्षा कितीतरी अधिक व्यापक संदर्भ असतात. कधी कधी आपल्याला लेखकांची नावंही नक्की माहीत नसतात. त्यांचा काळ माहीत नसतो. कधी कधी एकापेक्षा जास्त लेखकांचा ती साहित्यकृती किंवा संहिता तयार करण्यामध्ये हात असतो. त्यामुळे एखाद्या पाठ्याचा अर्थबोध (interpretation) 'लेखकाला जे म्हणायचं आहे ते' एवढाच मर्यादित असू शकत नाही.

एकाच कलाकृतीचं वेगवेगळ्या काळातले लोक वाचन करत असतात, ती समजून घेण्याचा प्रयत्न करत असतात. म्हणजेच लेखकाखेरीज प्रत्येक साहित्यकृतीला आणखी दोन बाजू किंवा परिमिती असतात - पहिली म्हणजे लिहिणाऱ्याची किंवा सांगणाऱ्याची, दुसरी वाचणाऱ्याची किंवा ऐकणाऱ्याची, आणि तिसरी बाजू म्हणजे प्रत्यक्ष साहित्यकृतीची – जसं पुस्तक, लेख, कविता इत्यादी; थोडक्यात ही तिसरी बाजू आहे पाठ्याची म्हणजे टेक्स्टची. तेव्हा लेखक, वाचक आणि पाठ्य ह्या प्रत्येक साहित्यकृतीच्या तीन परिमिती आहेत. लेखक हा निर्माता म्हणून महत्त्वाचा असला, तरी इतर दोन बाजूंचा किंवा परिमितींचाही विचार, अभ्यास, संशोधन व्हायला पाहिजे, असा विचार पुढे आला.

पाठ्याचं महत्त्व वाढलं आणि त्याचं एक शास्त्र निर्माण झालं. पाठ्य-भाषाविज्ञान (टेक्स्टलिंग्विस्टिक्स) अशी भाषाशास्त्राची एक शाखा निर्माण झाली. अमेरिकेमध्ये 'क्लोज रीडिंग' म्हणून अर्थबोधनाची एक पद्धत निर्माण झाली. तसंच फ्रेंचांनी 'आंतरपाठ्याचा' (inter-textuality) सिद्धान्त मांडला. ही पद्धती उचलून धरणाऱ्या लोकांचं म्हणणं होतं, फक्त पाठ्याकडे लक्ष द्या, पाठ्याला काय सांगायचं आहे, ते बघा. पाठ्य समजण्यासाठी इतर आजूबाजूच्या गोष्टींचा विचार करण्याची गरज नाही. थोडक्यात ही पाठ्यकेंद्रित आकलन पद्धती होती. इथे आपण 'पाठ्य'लक्ष्यी सिद्धान्तनाचा उहापोह न करता प्रामुख्यानं 'वाचक'लक्ष्यी मांडणीचा विचार करणार आहोत.

लेखकाच्या या पारंपरिक स्थानाला खरा शह दिला गेला, तो वाचकाच्या परिमितीचा विकास झाल्यामुळे. लेखक-केंद्रित संशोधन, विवेचन याविरुद्ध काही तज्ज्ञांनी एकप्रकारे बंडच केलं. रोलाँ बार्थ (Roland Barthes) नावाच्या साहित्य आणि संस्कृतीशास्त्रज्ञाने १९६७मध्ये एक निबंध प्रसिद्ध केला, त्याचं शीर्षक होतं 'द डेथ ऑफ द ऑथर!' अर्थात इतक्या टोकाच्या भूमिका फार टिकत नाहीत. आजही लेखकाचं महत्त्व सगळ्यांना मान्यच आहे. साहित्य समजण्यासाठी लेखकाची पार्श्वभूमी लक्षात घ्यावी लागते. पण ह्या वीस-पंचवीस वर्षं चाललेल्या चर्चांमधून एवढं निश्चित निष्पन्न झालं, की साहित्यकृती केवळ लेखकाच्या दृष्टिकोनातून न बघता प्रत्यक्ष पाठ्य आणि वाचक यांची बाजूही समीक्षकांनी, अभ्यासकांनी लक्षात घेतली पाहिजे.

हे इतर कलाक्षेत्रांनाही लागू होतं. म्हणून कलावस्तू निर्माण करणारा निर्माता (प्रोड्यूसर), घेणारा ग्राहक (रेसिपियंट) आणि कलाकृती (arte fact) ह्या तिन्ही बाजू आकलनाच्या आणि समीक्षेच्या दृष्टीनं महत्त्वाच्या आहेत. त्या वेळी असा एक विचार मांडला गेला, की लेखक लिहितो, तेव्हा खरं तर साहित्यकृतीची निर्मिती होतच नाही. लेखनप्रक्रियेत अनेक मोकळ्या जागा असतात. वाचक त्या वाचनप्रक्रियेत भरून काढतो. म्हणून साहित्यकृतीची खरी निर्मिती ही वाचनातून होते. म्हणजे वाचन मूलतः निर्मितीक्षम, सर्जनशीलच असतं. म्हणून केवळ लेखकाच्या जडण-घडणी-विषयी माहिती मिळवण्यापेक्षा वाचक कसा घडला, हे बघणं जास्त महत्त्वाचं आहे. म्हणजे पाठ्य समजण्यासाठी एका बाजूनं लेखकाचा उद्देश (Author's intention) महत्त्वाचा, तर दुसऱ्या बाजूनं वाचकाची पार्श्वभूमी (Reader's disposition) महत्त्वाची आणि वाचक म्हणून त्याची पूर्वपीठिका,

त्याची प्रकृती, त्याची वैचारिक-मानसिक तयारी, मनाची घडी (mind-set), त्याची जडण-घडण आणि अनुभवाची बैठक, अशा अनेक गोष्टींवर वाचकाचं वाचन आणि आकलन अवलंबून असतं. म्हणजेच प्रत्येक वाचक आपल्या परीनं, आपली मानसिकता, आपली पूर्वतयारी, पूर्वज्ञान, ह्यानुसार पाठ्यातल्या रिकाम्या जागा भरत असतो किंवा ते पाठ्य परिपूर्ण करत असतो.

ह्यातून तयार झाला एक ग्रहण सिद्धान्त (Reception Theory), म्हणजे माणसं कोणतंही पाठ्य कसं वाचतात, ग्रहण करतात, ह्याविषयीचं सिद्धान्तन. सर्वसाधारणपणे साहित्याचा इतिहास लिहिला जातो किंवा साहित्यकोश तयार केले जातात, तेव्हा त्यामध्ये प्रामुख्यानं लेखकांच्या नोंदी असतात. पण आता म्हणजे विसाव्या शतकाच्या शेवटी नवीन दृष्टिकोन देणारी आर्ट ऑफ रिडिंग, हिस्टरी ऑफ द रिडर यांसारखी पुस्तकं लिहिली गेली आणि गाजली. वाचनप्रक्रिया, वाचकाचे प्रकार आणि त्यांची वर्गवारी यांवरही लिखाण झालं.

ह्याच काळात संज्ञापनशास्त्रही विकसित झालं आणि त्यामुळेही वाचकाच्या भूमिकेला बळकटी आली. संज्ञापन म्हणजे भाषिक देवाण-घेवाण किंवा भाषिक दळण-वळण. म्हणजे संदेश मध्यभागी ठेवला, तर तो पाठवणारा माणूस एकीकडे आणि तो ज्याला मिळतो तो संदेश ग्राहक दुसरीकडे. ह्यांच्यामध्ये जे प्रेषण आणि ग्रहण होतं, ते म्हणजे संज्ञापन. प्रेषक, मग तो बोलणारा असेल किंवा लिहिणारा असेल; आणि जो संदेश प्राप्त करतो, तो ग्राहक. मग तो ऐकणार" असेल किंवा वाचणारा असेल. ग्राहकानं संदेश ऐकून त्यावर प्रतिक्रिया दिल्यानंतरच संज्ञापनाची एक कडी पूर्ण झाली असं मानलं जातं. थोडक्यात म्हणजे बोलणारा बोलत राहिला तर त्याला काहीच अर्थ नाही, त्याचा काहीच उपयोग नाही. त्याचं बोलणं दुसऱ्या माणसापर्यंत पोचलं आणि दुसऱ्याला ते समजलं, तरच बोलणाऱ्याच्या बोलण्याचा उपयोग आहे. म्हणून ह्या शास्त्रामध्ये संदेश कोणी पाठवला, ह्यापेक्षा दुसऱ्या माणसापर्यंत तो कसा पोचला, त्यानं तो कसा ग्रहण केला, त्यावर काय प्रतिक्रिया दिली, हे महत्त्वाचं ठरतं. म्हणजेच संज्ञापनामध्ये 'प्रेषका'पेक्षा 'ग्राहका'ला जास्त महत्त्व आहे. कारण ग्राहकाच्या प्रतिक्रियेनंतरच संज्ञापन पूर्ण होतं.

त्याचप्रमाणे लेखकानं पुस्तक लिहून उपयोग नाही. जोपर्यंत एखादा वाचक ते वाचत नाही, तोपर्यंत त्या पुस्तकाचं जगाच्या दृष्टीनं अस्तित्वच नसतं. त्यामुळे लेखकापेक्षा वाचकाला जास्त महत्त्व प्राप्त होतं. तत्त्वज्ञानाच्या एका शाखेत मूलभूत विचार आहे, "तू मला बघतोस, महसूस करतोस, म्हणून मी आहे. नाही तर मला अस्तित्वच नाही." तसं साहित्याचं अस्तित्वच मुळी वाचकावर अवलंबून आहे.

एखादी कथा-कादंबरी वाचताना किंवा अगदी एखादा वैज्ञानिक निबंध वाचताना आणि समजून घेतानासुद्धा प्रत्येक वाचक आपल्या मनातल्या प्रतिमा आणि संदर्भ-चौकटी यांचा वापर करतच असतो. त्यामुळे प्रत्येक वाचकाच्या मनात उभं राहणारं चित्र थोडं वेगळं असतं. तिथे प्रत्येकाच्या कल्पनाशक्तीला आणि निर्मितीक्षमतेला वाव असतोच. एक साधं उदाहरण पाहू. एखादी परीकथा वाचताना किंवा ऐकताना मुलं आपापल्या परीनं

परीचं चित्र मनात रंगवतात. प्रत्येकाच्या मनातले रंग आणि रूप वेगळं असतं. पण हीच कथा स्टेजवर सादर केली, तर त्या मूर्त रूपामुळे कल्पनेला वाव कमी राहतो. बघितलेलं रंग-रूप मनात उतरतं आणि थिजतं. अशा वेळी वेगवेगळ्या वाचकांच्या मनातल्या परीच्या चित्रात फारसा फरक राहत नाही.

आपण 'वाचतो' म्हणजे काय करतो? प्रथम अक्षरं किंवा शब्द डोळ्यांनी बघतो. मग त्यांच्या अर्थाची उकल करतो. ती कशी शक्य होते? आपण हे शब्द कित्येकदा ऐकलेले असतात, त्यांना संदर्भ असतो. त्यावरून आपण आपल्या मनात एक चित्र उभं करतो किंवा मत बनवतो. हे चित्र किंवा मत वाचक म्हणून असलेल्या आपल्या बैठकीवर, प्रकृतीवर अवलंबून असतं. आपले अनुभव, आपला विश्वास, आपली वैचारिक बैठक वगैरे अनेक गोष्टींवर ते अवलंबून असतं. एक अलीकडचं उदाहरण घेऊ या. कन्हय्याकुमारच्या भाषणाचा वर्तमानपत्रात गोषवारा आला होता. त्यावरच्या प्रतिक्रियांवरून लक्षात येतं, की वाचतांना प्रत्येक वाचकाच्या मनात वेगळे संदर्भ असतात. वाचकाची मनोधारणा (reader's disposition), पूर्वपीठिका, अनुभव, इत्यादीला - अनुसरून प्रत्येक वाचकाच्या मनात एक वेगळं चित्र उभं राहतं आणि त्यातून वेगवेगळा अर्थ काढला जातो. कोणाला कन्हय्याकुमार प्रेरणादायी आणि स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता वाटतो, तर कोणाला देशद्रोही वाटतो. इतक्या विरुद्ध टोकाचं वेगळं आकलन, अर्थबोधन होऊ शकतं, हा आपला अनुभव आहे.

वाचका-वाचकांमधला फरक फारच जाणवतो तो एका भाषासमाजाच्या कक्षा ओलांडल्यावर. आपण परभाषेतलं पुस्तक वाचतो तेव्हा आपण आपल्या भाषक समाजातली आणि संस्कृतीतली प्रतिमा-प्रतीकं नकळत संदर्भासाठी घेत राहतो. आपल्या भाषक-समाजाची प्रकृती, विचार करण्याची पद्धत, अनुभवाची पार्श्वभूमी यातून आपल्यामधला वाचक घडत असतो.

पु. ल. देशपांड्यांनी 'तीन पैशाचा तमाशा' हे ब्रेश्तचं नाटक जर्मनमधून मराठीत आणलं. कोणताही भाषांतरकार हा प्रथमत: प्राय: परभाषेतल्या संहितेचा वाचक असतो आणि मग तो त्या संहितेचं दुसऱ्या भाषेत, म्हणजे सर्वसाधारणपणे स्वभाषेत पुनर्गठण करतो. पु. ल. देशपांड्यांची 'वाचक' म्हणून बैठक (disposition) कशी होती? आणि त्यांनी ज्या वाचकवर्गासाठी हे नाटक लिहिलं, ते आपण सर्व. वाचक / प्रेक्षक / ग्राहक म्हणून आपली बैठक कशी आहे? तर ब्रेश्त आणि त्याच्या जर्मन भाषक वाचकांपेक्षा नक्कीच वेगळी, हे ह्या मराठी नाटकातून वेळोवेळी दिसतं.

ब्रेश्तचा हेतू आणि त्याच्या नाटकाचं प्रयोजन निश्चित होतं. प्रेक्षकांनी प्रसंगाशी एकरूप न होता सादर केलेल्या घटनांवर दोन्ही बाजूंनी विचार करावा, ही त्याच्या 'एपिक थिएटर'ची मूळ अपेक्षा. माणूस परिवर्तनशील असतो आणि परिवर्तन घडवून आणलंच पाहिजे, असं त्याचं ठाम मत होतं. वर्गविग्रहावर आणि दैवावर मात करून साम्यवादी समाजाची निर्मिती हा केंद्रीभूत विचार होता. त्यासाठी नाटक हे एक साधन होतं.

'थ्री पेनी ऑपेरा' ह्या मूळ शीर्षकातला उपरोध 'तीन पैशाचा तमाशा' ह्या शीर्षकामुळे नाहीसा होतो. ऑपेरा म्हणजे अति श्रीमंती, प्रतिष्ठित समजला जाणारा





अनुक्रमणिका

नाटयप्रकार आणि तो तीन पैशाचा! ही विसंगती मराठी नाटकाच्या सुरवातीलाच हरवून जाते. गरीब-श्रीमंत ह्यातला बोचक विरोध जाणवत नाही. ह्या नाटकातली मुख्य पात्रं अंकुश (मॅक) आणि भंडारे (ब्राऊन) हे जर्मन नाटकात युद्धामध्ये खांद्याला खांदा लावून लढलेले मित्र असतात, तर मराठी नाटकात ते एका क्रिकेट टीममध्ये असतात. मराठीत युद्धाचा संदर्भच येत नाही. कारण आपण महाराष्ट्रामध्ये तीन शतकात युद्धाचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला नाही. युद्धातला संहार जर्मन लोकांनी बघितला तसा आपण बघितलेला नाही.

ब्रेश्तच्या नाटकातली गाणी ही प्रेक्षकाला थेट संदेश देणारी असतात. 'तोफांचे गाणे', 'तीन पैशाची' तीन गाणी, ज्यामध्ये श्रीमंतांची मुजोरी आणि युद्धातले अत्याचार असे विषय आहेत, ती मराठीमध्ये पूर्णपणे गाळली आहेत. दोन महायुद्धाच्या मधल्या काळात हे जर्मन नाटक लिहिलं गेलं. त्या वेळच्या जर्मनीतल्या राजकीय आणि सामाजिक स्थितीच्या पार्श्वभूमीवर आणि साम्यवादी विचारप्रणालीवर आधारित हे नाटक समाजातली असमानता दूर करण्याचा संदेश देते. जर्मन नाटकात राणीच्या राज्याभिषेकाच्या प्रसंगी काढलेल्या एका फतव्यामुळे अंकुशची फाशी रद्द होते. उच्चपदस्थांच्या मर्जीवर लोकांचं जीवन कसं अवलंबून आहे, हे ह्यातून दिसतं. उलट, मराठी नाटकात नारायण नावाचा जेलर देवाच्या रूपात अवतरतो आणि चमत्कृतीपूर्ण रीतीनं अंकुशला वाचवतो! हे मराठी समाजाच्या प्रकृतीला धरून असलं तरी ब्रेश्तच्या नाटकात देव आणि चमत्कार म्हणजे त्याच्या हेतूचा आणि विचारांचा मोठा विपर्यासच आहे! म्हणजे जर्मन लेखक आणि वाचकाच्या दृष्टीनं सगळ्यात अग्रस्थानी असलेले कळीचे मुद्दे मराठीत येतच नाहीत. 'तीन पैशाचा तमाशा' हे मराठी नाटक करमणूकप्रधान आहे आणि मराठी वाचक-प्रेक्षकाच्या प्रकृतीला रुचेल असंच आहे. पण त्यात ब्रेश्त आणि त्याचा संदेश मात्र हरवलेला आहे. आपण जसे घडलो आहोत, त्या आपल्यामधल्या वाचकाच्या बैठकीला भावणारं असं हे एक यशस्वी नाटक आहे.

हे नाटकच काय, पण टी.व्ही.वरचे सर्व कार्यक्रम, विशेषत: मालिका, ह्या प्रेक्षकाला/ ग्राहकाला अनुलक्षूनच (टी.आर.पी.!) असतात. ह्यातून आज वाचक/प्रेक्षक/ ग्राहकाचं स्थान कसं प्रभावी होत चाललं आहे, ते आपल्या लक्षात येतं! वाचकाची किंवा ग्राहकाची परिमिती जाणून घेणं हे आज आवश्यकच आहे. ह्या परिमितीमुळे आपण एखादी कलाकृती एका नव्या परिप्रेक्ष्यातून बघू शकतो.

---

**लेखकांना आवाहन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका भाषा आणि जीवन' या त्रैमासिकासाठी आपल्याकडून लेखन हवे आहे. आपले भाषाविषयक अनुभव, भाषिक वैशिष्ट्यांचा विशेष अभ्यास केलेली पुस्तक-परीक्षणे, विविध साहित्यकृतींचा किंवा लेखकांच्या लेखनाचा भाषिक अभ्यास, समाजातील बदलते संज्ञापन यांसारख्या विषयांवर आपल्याकडून लेखन हवे आहे. आपले लेखन **marathi.abhyas.parishad @ gmail.com** या ई-पत्त्यावर नक्की पाठवा. आपले नियतकालिक विद्वत-प्रमाणित असल्याने लेखाचे परीक्षण होऊन लेख प्रकाशित होण्यास वेळ लागू शकतो, याची कृपया नोंद घ्यावी.

लेख

## भटक्या जमातीच्या बोली (गोंधळी, कुडमुडे-जोशी या जमातींच्या संदर्भात)

विश्वनाथ शिंदे

गोंधळी, कुडमुडे-जोशी, वासुदेव, डवरी-गोसावी, चित्रकथी, नंदीवाले, गोपाळ, कोल्हाटी इत्यादी जातींचा समावेश भटक्या जमातींमध्ये होतो. ह्या जाती प्रामुख्याने महाराष्ट्रात राहणाऱ्या आहेत. यांपैकी काही लोक स्थलांतर करून भिन्नभिन्न भाषिक प्रदेशात स्थायिक झाले आहेत. प्रस्तुत निबंधात उपरोक्त जातींपैकी गोंधळी आणि कुडमुडे-जोशी या जमातींच्या बोलींचा अभ्यास मांडतो आहे. ह्या जाती आपल्या बोलीभाषेचा निर्देश 'पारुषी' किंवा 'फारसी' असा करतात. याच स्वरूपाची बोली चित्रकथी, नंदीवाले, गोपाळ हेदेखील बोलतात. मांग जातीच्या 'अंबुजी' बोलीशी भटक्यांच्या पारुषी बोलीचा आश्चर्यकारक सारखेपणा असलेला दिसतो. हे द्विभाषक समाज आहेत. इतर जातींच्या लोकांशी बोलताना ते मराठी बोली वापरतात तर आपापल्या समाजबांधवांशी बोलताना पारुषी बोलीचा अवलंब करतात. पारुषी ही बोली मर्यादित स्वरूपाच्या जीवन व्यवहाराला सामावून घेणारी एक संकेतबोली आहे. आपले बोलणे दुसऱ्याला कळू नये हा त्यामागील हेतू असतो. या बोलीची शब्दसंख्या मर्यादित असते आणि विशिष्ट मतलबासाठी ही बोली वापरून संप्रेषण घडविले जाते.

गोंधळी, कुडमुडे-जोशी ह्या जाती भीक मागून उदरनिर्वाह करीत अत्यंत हीन स्थितीत जगत असतात. आपल्यापुरता एक कोश बनवून समाजाच्या मुख्य प्रवाहापासून ते दूर राहतात, गावात घर नाही, शिवारात शेत नाही, त्यामुळे कोणत्या तरी गावाच्या आसऱ्याने गावाच्या शेजारी थोडे फटकून पाल टाकून तात्पुरते वास्तव्य करून राहतात. त्या गावातला शेर संपला की दुसऱ्या गावाला जातात, अशी त्यांची अखंड भटकंती सुरू असते. मराठा राजवटीत ह्या जातीचे काही लोक मराठा सरदारांबरोबर कर्नाटक, आंध्र, मध्यप्रदेश, गुजरात, दिल्ली या ठिकाणी स्थलांतरित झाले व तेथेच स्थायिक झाले. त्या ठिकाणी ते स्वतंत्र परंपरा टिकवून आहेत. जोशी आणि गोंधळी जातीचे लोक महाराष्ट्र राज्याच्या सर्व भागात आहेत. ते विखुरलेले असल्याने त्यांची लोकसंख्या नेमकी सांगता येत नाही, पण ती पन्नास लाख असावी, असे अदमासे म्हणता येते.

**गोंधळी** : गोंधळी जमातीत, रेणुराई आणि कदमराई असे दोन पंथ असून रेणुराई हे तुळजाभवानीचे भक्त आहेत तर कदमराई हे माहूरच्या रेणुका मातेचे उपासक आहेत, असे म्हटले जाते. पण हे अगदी काटेकोर नाही. हे दोन्ही पंथ देवीच्या नावाने गोंधळाचे कार्यक्रम करीत असतात. यांचा मूळ व्यवसाय कथेकऱ्यांचा. भारताच्या सूतसंस्कृतीचे या युगातील हे वारसदार आहेत, असे श्री. रं. कुलकर्णी यांनी म्हटले आहे. क्षत्रियकुलातील यजमानाच्या घरी कुलाचार म्हणून ते देवीचा गोंधळ विधी करत असतात. देवीची भक्ती करून

लोकांच्या मनाचे समाराधन करण्याचे काम या जमातीने गेली सातशे वर्षे केले आहे. मनोरंजनाबरोबर संस्कार करण्याचे कार्य गोंधळी करत आले आहेत. या जमातीची कथनशैली फारच आकर्षक असते, रामायण, महाभारत, पुराण आणि लोककथांमधील कथा गद्य-पद्य स्वरूपात अत्यंत प्रभावी स्वरूपात ते प्रयोगरूपाने सादर करीत असतात. त्यांच्या भाषेत एक प्रकारची लय व गोडवा असतो. हे कार्यक्रम लग्न, बारसे अशी शुभकार्ये, नवरात्र, दसरा इ. सणांनिमित्त केले जातात. संबळ, तुणतुणे, टाळ या वाद्यांसह आपल्या साथीदारांसह रात्रीचे जेवण झाल्यापासून पहाटेपर्यंत हा कार्यक्रम चालतो. या गोंधळी लोकांना बिदागी म्हणून भिक्षा दिली जाते. गोंधळी अत्यंत बहुश्रुत असतो, तो कसबी कलावंत असतो. उत्तम गायक असतो, आरोह-अवरोह, पात्रांचे संवाद, त्यांच्या भावभावना याचा आविष्कार वाखाणण्याजोगा असतो. शाहीर परशुराम याच्याबरोबर तुलशीराम नावाचा प्रसिद्ध गोंधळी होता, अशी नोंद य. न. केळकर यांनी केली आहे. तेलंगणात संजीवराव वानरसे या गोंधळीने कळसूत्री बाहुल्याचे खेळ आणि 'सुरभि' नाट्यसंस्था काढली होती, पेद्दरामया वानरसे यांची पत्नी पापाबाई या स्त्री नटी म्हणून १८८५ मध्ये नाटकात काम करत होत्या, अशी नोंद श्री. रं. कुलकर्णी यांनी केली आहे.

गोंधळी करपल्लवी या सांकेतिक लिपी किंवा भाषेचा वापर करतात. 'अ'साठी उभी मूठ बंद करून अंगठा वर काढणे, 'क'साठी आडवी मूठ बंद करून करंगळी वर काढणे, 'ख'साठी खड्ग-तलवार मारतेवेळी हात जसा वरून खाली करतात तशी हालचाल करणे, 'ग'साठी गगन-आकाश दाखविणे, 'घ'साठी घंटा हलवताना आपण मुठीची जी हालचाल करतो, तशी कृती करणे, 'छ'साठी पालथ्या हाताने छत्रीचा आकार करून दाखवणे, 'ट'साठी टणत्कार करणे(अंगठ्याने व तर्जनीने धनुष्याची दोरी ओढल्यासारखे करणे), कान्यासाठी करंगळीच्या पहिल्या पेरापासून शेवटच्या तिसऱ्या पेरापर्यंत म्हणजे वरपासून खालपर्यंत अंगठा फिरवला जातो, वेलांटीकरता तर्जनीच्या वरच्या टोकापासून खाली शेवटपर्यंत अंगठा फिरवला जातो. उकारसाठी मूठ झाकून ७ चा आकडा काढल्याप्रमाणे हातास गती दिली जाते. यापद्धतीने सर्व बाराखड्या संकेत ठरवून भाषा तयार केली जाते. येथे दोन साथीदार असतात, संबळ वाजवणारा एखाद्या व्यक्तीचे नाव विचारून तुणतुणे वाजवणाऱ्या साथीदारास उपरोक्त पद्धतीने सांगतो. २५ -३० फूट लांब उभ्या असणाऱ्यास संकेत माहीत असल्याने तो त्या अनोळखी व्यक्तीचे नाव नेमके ओळखतो, त्या बदल्यात तो बिदागी देतो. अशी करपल्लवी भाषाप्रक्रिया असते. गोंधळी समाजाने ही बोली उपजत शहाणपणाने आत्मसात केली आहे.

**जोशी जमात :** भारतभर अनेक वर्षापासून लोकांचे भविष्य सांगत फिरणाऱ्या ह्या जमातीमध्ये पिंगळा-जोशी, कुडमुडे-जोशी, सटवाईवाले, मेढंगी, वासुदेव, राघुवाले जोशी अशा उपजाती आहेत. हस्तरेषा, भाग्यरेषा, पिंगळा पक्ष्यांची भाषा समजून भविष्य सांगणे, चित्राद्वारे भविष्य कथन करणे, याबरोबर रेवड भरणे, भांडी विकणे असे व्यवसाय हे लोक

करतात, स्त्रिया जुने कपडे विकणे, गोधड्या शिवणे अशी कामे करतात. 'आज झाडावर पाखरू तुझ्या घराबद्दल बोललंय, शकून सांगतंय, ते मला कळतंय' असे म्हणत पिंगळा जोशी दारावर येऊन हाळी देतो. चांगलं-वाईट पूर्व-पश्चिम दिशेला; पिंगळा वाईट बोलतंया; कोणत्या परी पिंगळा बोलतो; शंभु शंकरा महादेवा येडुर पक्षी; पाल बोलती वळचणीला; घुबड बोलत मसनाला; टिटवी बोलती आकाशाला; पिंगळा बोलतंय गल्लीला अशी गद्य-पद्य स्वरूपाची विधाने असतात.

पहाटेच्या वेळी हातात कंदील घेऊन, गोड आवाजात गाणी गात उपदेशपर गाणी गात गल्लीतून फिरून लोकांना जाग आणणारा, बाया-बापड्यांना भविष्य ऐकवणारा आणि मूठभर धान्य, पैसा-अडका, भिक्षा म्हणून घेणारा हा जोशी पूर्वी दिसायचा. डोक्याला मुंडासे, अंगात कोट, खांद्यावर झोळी, डोक्याला बांधलेल्या मुंडाशावर बांधलेल्या कापडी पट्टीवर सूर्य, चंद्र, नवग्रह, भवानीमाता या प्रतिमा लावून हातात डमरूसारखे वाद्य (ज्याला भांबा असे हे लोक म्हणतात) मंजूळ आवाजात वाजवत लोकांचे लक्ष वेधून घेणारा कुडमुडे -जोशी भविष्य सांगत असतो. जय होतया, लक्ष्मी पावतीये, तुझ्या घरात सुख निर्माण करतो, तुझ्या संपत्तीत बरकत आणतो, तुझ्या मुलांनी तुझं ऐकावं असं करतो, असे बोलत जोशी समोरील व्यक्तीला भुलवतात किंवा एखाद्याला चार मुले आहेत असे सांगायचे असेल तर 'सात फल कर्मात, सहाच पचावर बात्तार चालू आहे.' अगर तुम्ही चार भाऊ आहात असे सांगायचे झाल्यास 'सात घर तुमच्या सोयऱ्याची, चार भावचा विस्तार 'किंवा दोन मुले-दोन मुली असे सांगायचे आहे 'ताक–दूध बरोबर, दोन घरी राहणार दोन लोकांच्या घरी जाणार' अशी भविष्य सांगण्याची पद्धत असते. हा सर्व तपशील पाहता आपणास असे कळते की, हे लोक इतर समाजातील लोकांशी संप्रेषण करताना मराठी बोली वापरतात. मात्र आपल्या बांधवांशी बोलताना सांकेतिक बोली वापरतात. त्या बोलीचे स्वरूप आता पाहू.

**शब्दसंग्रह :** पारुषी किंवा फारशी बोलीतील शब्दसंग्रह फार कमी आहे, पण तो कुणी संकलित केलेला आढळत नाही. या बोलीस 'खिवटीबोली' असेही संबोधले जाते. आता या बोलीतील काही शब्द आणि त्यांचे मराठी अर्थ पाहू. गोडसा=चहा, खीबास=बस, कुडप=पी, पनव्हा=मुलगा, पनवी=मुलगी, ठिकीव=ठेव, खेमड्या=चोर, शिपड्या=पोलीस, चिड़क=बघ, खुकान=जा, नरगा=नवरा, नरगी=नवरी, बलसी=मटन, कनसीन=बाई, चिवानी=पाणी, खोंबाड़=तोंड, मेकल्या=लहानमासे, यनग=आमटी, कनशा=पुरुष, नंगल्या=खेकडा, रिसाड़ी=लुगडं, गवन्या=पाय, भूत=बेंदवाड, कवची=भांडी, खवटी=अंडी, घाटल्या=तांब्या, नेमाने=बकरी, इरचिक=नाक, खबस=खालीबस, टापकी=भाकरी, खुसडा=मुसलमान, कुगाड=महार, खपल=पल, यंकटी=काठी, कुड=घर, नाट=घर, झुकल=कुत्रा, चमाग्या=चांभार, वैत=खा, रेवाट=मटन, गालची=शिवी, चोलने=बोलणे, गसकला=आला, खवन्डा=भांडन, ठाल=गप्प, खंदरा=पंधरा, खूकान=जा, हाटल्या=पाटील, चिंगाई=दारू, लुगव=मार,





अनुक्रमणिका

लुगला=मेला, ठल्लाय=आहे, फेंदग=दूध

**वाक्यरचना :** टापकी लेकली का?(भाकरी खाल्ली का ?), ती गासकनारी कनसीन टिकते. (ती येणारी बाई दिसते.), त्याने पकली गासकावली. (त्याने कोंबडी आणली.), वाकान्याला चिवानी कुदपीव. (घोडयाला पाणी पाज.), नरग्याने शिकारी सनली. (नवऱ्याने शिवी दिली.), सोंबाडी खिकुन किती खापा गसकला?(म्हैस विकून किती पैसे आले?), बेंदयाला फतऱ्या बोकाव. (देवाला नारळ फोड.), खामन्याच्या नाटात कोण लुगल? (बामणाच्या घरात कोण मेलं?), खरपुसीची बलसी सिशी ठाल्लीय. (घोरपडीचं मटन चांगलं हाय.), ये पनव्या खुकनू नटी झुकल कटावल. (ये पोरा! जाऊ नको! कुत्रं चावंल!), पनवी चिन्नी ठाल्लीय. (मुलगी सुंदर आहे), मखिन डोंबर ठाल्ली. (बाई गरोदर आहे), खांदर खपडलंय जाऊ नटी. (अंधार पडलाय. जाऊ नको.)

**पारुषी बोलीतील परिच्छेद :**

१) का करू बाँ, त्या नाटाला खुकानलो, तिथं लोभू दिलं नटी. सरपंचान मला लुगवल, म्हणून कायतरी काम करून खुयतोय आता लोबन बंद झाल. उधोग करवडून खुयततोय, जिथ खुकाननलो तिथ लोबू दिनात सरकार, आता का करवाडाच? (काय करू बा, त्या गावाला गेलो तिथं भीक मागू दिलं नाही. सरपंचानं मला मारलं, कायतर काम करून जगतोय. भीक मागणं बंद झालं, सरकार मागू देत नाही. आता काय करायचं?)

२) आज म्या बलसी गासकीवली, वैतायला गासकनार का? माझ्या नरगीन मेकलीच यनग करवाडले, वैतून-हाटल्याच्या नाटाला खुकानतों. त्यो ये चोललाय, खाप न टापक्या चिदरून खुकान. हाटल्या नाटात ठाल्लाय, त्यो कालकी कुडपनाऱ्या कनशाना सीकारी सनतोय. (आज मी मटन आणलंय, जेवायला येतो का? माझ्या बायकोनं मासे आणले आहेत, कालवण केलंय, जेवून पाटलाच्या घरी जातो. तो ये म्हणाला आहे. पैसे आणि भाकरी घेऊन जा, पाटील घरी आहे, तो दारू पिणाऱ्यास शिव्या देतो.)

मी भाषाविज्ञानाचा अभ्यासक नाही. त्यामुळे भाषावैज्ञानिक पद्धतीने पारुषी बोलीचे विश्लेषण मला करता येणार नाही, तसा ह्या लेखाचा हेतूही नाही. मात्र पारुषी बोली संकलनाचा उपयोग बोलीचा अभ्यास करणाऱ्यास झाला तर मला आनंद होईल. पण या लेखाचा समारोप करताना काही निरीक्षणे मी नोंदवतो. १) आपण जे बोलतो ते अन्य समाजातील लोकांना कळू नये, हा या बोली निर्मितीमागील मुख्य हेतू असावा. कदाचित ही त्यांची व्यवसायाची गरज असावी. २) मात्र पारुषी ही नेमकी कोणत्या प्रमाणभाषेची बोली असावी, हे काही कळत नाही. प्रमाण मराठीतील शब्दांत पुढे-मागे एखादा नवीन वर्ण घालून काही शब्द घडवले गेलेले दिसतात, पण तसे शब्द अल्प आहेत. ३) प्रमाण मराठीतील एखाद्या शब्दाला विशिष्ट अर्थ बहाल केला जातो. ४) नवा शब्दही तयार केला जातो. मराठी भाषक समाजात अनेक शतके वावरत असणाऱ्या गोंधळी-जोशी समाजाने मातृपितृ-दायित्वाने सांभाळलेले हे संचित आहे. गोंधळी-जोशी जमातीचे लोक अशिक्षित

असल्याने ग्रांथिक भाषेचे संस्कार या बोलीवर झाले नाहीत. स्वत:चे एक स्वतंत्र जातगाव करून हे लोक राहत असल्याने शिष्टाशिष्ट संपर्क, वर्तमान भाषेशी संपर्क या बोलीच्या वाट्याला आला नाही. हा भटका समाज इतर भाषक समाजात वावरत असला तरी मराठी भाषेवर प्रभाव पडावा, इतकी पारुषी बोली सामर्थ्यवान नाही. पारुषी बोलीचा शब्दसंग्रह संख्यात्मकदृष्ट्या अत्यंत तोकडा आहे. मराठी भाषेशी तिचे नाते कोणते? मराठी भाषा आणि परंपरा यांच्या गोतावळ्यात हया बोलीचे नेमके स्थान काय? ऐतिहासिक व सामाजिकदृष्ट्या ही बोली कुठे बसते, याचा बोध होत नाही. शब्दसंग्रह, वाक्यरचना पाहिल्यानंतर ही बोली अशी आहे, हे कळते. पण ती तशी का आहे? तिचा जन्म कधी झाला? तिच्या निर्मितीचे प्रयोजन कोणते? या प्रश्नांची उत्तरे मिळत नाहीत. ती मिळाली तर या पारुषी बोलीच्या अभ्यासाला गती मिळेल.

संदर्भ ग्रंथ आणि टीपा -


१. श्रीधर रंगनाथ कुलकर्णी, तेलंगणातील अरे मराठा समाज : भाषा आणि संस्कृती, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, १९८७

२. विश्वनाथ शिंदे, शाहिरी वाङ्मयाच्या धारा, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर (दु. आ.) २०१४

३. वि. रा. वासुदेव, भटक्या समाजाची उत्पत्ति लोककला, संस्कृती, अप्रकाशित.

४. बाजी सदाशिव कबरे, करपल्लवी, मनोरंजन प्रकाशन, मुंबई १९६६


---

**भाषा-वार्ता**

**विद्यार्थिनींची शिक्षकांना संकेतस्थळाची भेट :** गुरूकडून मिळालेल्या ज्ञानाने आपण समृद्ध झालो, तसेच ते इतरांनीही व्हावे, असा विचार काही विद्यार्थिनी करतात आणि दोन शिक्षकांच्या कृतज्ञतेप्रति त्यांच्या साहित्याला वाहिलेले संकेतस्थळ सुरू होते. डॉ. द. दि. पुंडे व डॉ. कल्याण काळे या दोन निवृत्त प्राध्यापकांना त्यांच्या विद्यार्थिनींनी 'पुंडे-काळे संकेतस्थळ' ही अनोखी भेट दिली आहे. द.दि.पुंडे आणि कल्याण काळे सरांच्या जीवनकार्याविषयी माहिती देणाऱ्या pundekale.in या संकेतस्थळाला डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या शुभहस्ते रविवारी सुरूवात झाली. वाङ्मयेतिहास विषयाचे महाराष्ट्रातील महत्त्वाचे विद्वान संशोधक, चाळीसहून अधिक वैचारिक, समीक्षात्मक, विद्यार्थ्यांसाठी तयार केलेल्या पुस्तिका, भाषाविषयक ललित पुस्तके अशी विपुल ग्रंथसंपदा असणारे मराठीतील ज्येष्ठ विद्वान समीक्षक आणि संशोधक, अशी पुंडे सरांची ओळख आहे. भाषाविचार आणि संतसाहित्याचे गाढे अभ्यासक व संशोधक, अनेक ग्रंथांचे संपादक, भाषा आणि जीवन या मराठी अभ्यास परिषदेतर्फे निघणाऱ्या नियतकालिकाचे काही काळ संपादक, असा काळे सरांचा लौकिक आहे.

लेख

# जलसंस्कृतीची भारतीयता

## (औरंगाबाद येथे जल-अभियंत्यांसमोर केलेल्या व्याख्यानाचा संपादित भाग)

**माधवराव चितळे**

संस्कृती म्हणजे काय? माणसा-माणसांमधले नाते व्यक्त करणे, हा संस्कृतीचा एक भाग झाला. आपले सगळे जीवन, माणसा-माणसांमधल्या नात्यावर अवलंबून नसते. पृथ्वीतलावरचं आयुष्य जगत असताना 'या नंतर काय?' याचाही विचार आपल्या मनामध्ये कधी कधी येत असतो. दृश्य असणाऱ्या जगाच्या पलीकडचा हा जो परलोक विचार आहे, त्याचे कळत-नकळत आपल्या व्यवहारांवर, चालीरितींवर परिणाम होत असतात. संस्कृतीचा तो एक मोठा भाग असतो. पण संस्कृतीचा तिसरा टप्पा याहीपेक्षा फार मोठा आहे. सभोवतीच्या निसर्गाशी, समुद्रासारख्या किंवा वाऱ्यासारख्या पार्थिव वस्तुंशी, पशुपक्ष्यांशी, वनस्पतींशी आपले नाते आपण कसे सांभाळतो, कसे व्यक्त करतो, त्या नात्यांची आपण कशी आठवण ठेवतो, त्या नात्याच्या सीमा आपण कुठे ओलांडतो का? यावर आपली संस्कृती ठरते. निसर्गाशी असलेले आपले तरल नाते जपता येणे हे संस्कृतीचे एक प्रमुख वैशिष्ट्य समजले जाते.

ज्यामध्ये कुठल्याही विशिष्ट देवतेची पूजा नाही, कुठल्याही एका धर्माचा-पंथाचा संबंध नाही असे, केवळ निसर्गप्रवण उत्सव आपल्या भारतीय परंपरेत सर्वात जास्त आहेत. वेगवेगळ्या ऋतूंचे उत्सव आहेत. कोजागिरी पौर्णिमेची कोणी विशिष्ट उपास्य देवता नाही. तरी या शरद ऋतूतील चांदण्याला आपल्या सामाजिक जीवनात मोठे स्थान आहे. वसंत ऋतूचे आगमन सांगणारा वसंतपंचमीचा उत्सव आहे किंवा पंजाबात लोकप्रिय असणारा भांगडा आहे. ज्यावेळेला थंडीचा शेवट होतो आणि वसंत ऋतूचा प्रारंभ होतो, त्यावेळेला उफाळून येणारा तो सहज अविष्कार आहे. होळी हा उत्सवसुद्धा वसंत ऋतूचा प्रारंभ व थंडीची सांगता व्यक्त करण्यासाठी आपण साजरा करतो. सूर्याचे राशीभ्रमण दर्शवणारा मकर संक्रांतीचा-रथसप्तमीचा उत्सव आहे किंवा सूर्य लवकर मावळणार म्हणून दिव्याची अमावास्या आहे. हे सगळे उत्सव भारतीय परंपरेमध्ये रुजलेले आहेत. आपले निसर्गाशी, ऋतुचक्राशी, हवामानाशी, चंद्राच्या कलांशी असणारे नाते या उत्सवांमधून आपण व्यक्त करतो.

प्रदीर्घ काळापासून हा देश 'तलावांचा देश' म्हणून ओळखला जातो. जे जे लोक या देशात पर्यटनाला आले, शिकायला आले, त्या सर्वांनी आपल्या या देशाचे वर्णन 'तलावांचा देश' असेच केले आहे. आपल्या सगळ्या परंपरेत तलावांचे महत्त्व किती होते, यासाठी महाभारतातले उदाहरण घेऊ. महाभारतामध्ये मोठे युद्ध झाले, सगळीकडे स्थिरस्थावर झाल्यावर नारदमुनी युधिष्ठिराला भेटायला गेले. एवढे मोठे, कटु युद्ध झाल्यावर राज्याची व्यवस्था आता कशी ठेवायची? आता नवीन युग कसं निर्माण करायचे? या विषयीची चर्चा त्यांनी शांतिपर्वात केली. दोघांच्या त्या संवादामध्ये

नारदमुनींनी युधिष्ठिराला प्रश्न विचारला की. "कच्चिद राष्ट्रे तडागानि पूर्णानि बहंति च" (तुझ्या अधिकारक्षेत्रातले तलाव पूर्ण भरलेले आहेत ना?) कारण समाजाची समृद्धी, आरोग्य, सुखस्वास्थ्य हे त्यांच्या आधारावर उभे राहणार आहे. अशी ही मुबलकता आपल्याजवळ आहे ना, याचा आढावा आपण दरवर्षी घटस्थापनेच्या दिवशी घेत असतो. पावसाळा संपलेला असतो. आपण जे तलाव बांधले आहेत, ते नीट भरले आहेत ना? जर भरलेले नसतील तर या वर्षी परिस्थिती कशी सावरायची याची योजना नवरात्रीच्या दिवसांमध्ये एकत्र बसून चर्चा व विचारविनिमयांतून करायला हवी. त्यामुळे घटस्थापना ही संकल्पना आपल्या समाजात स्थिरावली. वनस्पतीच्या-प्राणिमात्राच्या रुपांतून व्यक्त होणाऱ्या जीवसृष्टीचा आधार असणारे आणि निसर्गाचा एक महत्त्वाचा घटक असणारे 'पाणी' तत्त्व आहे. या तत्त्वाशी असणारे आपले नाते, हे आपण ज्या पद्धतीने व्यक्त करतो व व्यवहारात सांभाळतो, त्यावर आपली सामाजिक, सांस्कृतिक उंची ठरते.

कोजागिरी पौर्णिमेनंतर येणाऱ्या त्रिपुरी पौर्णिमेला नदीच्या काठी जाऊन नदीची पूजा करायची, नदीत तेवते दिवे तरंगत सोडायचे, मोठ्या आदराने नदीचे आणि आपले जे नाते आहे त्याची पुन्हा एकदा गौरवपूर्ण आठवण करून द्यायची. विशेषत: उत्कल प्रांतात, पश्चिम बंगालमध्ये, बांग्लादेशमध्ये ही परंपरा अजूनही मोठ्या प्रमाणात खेड्याखेड्यात पाहायला मिळते. उडीसा(उत्कल) प्रांतामध्ये या नदीपूजेला आणखी एक वेगळा अर्थ आहे. जसे दसऱ्याला महाराष्ट्रातून सीमोल्लंघनाला योद्धे बाहेर पडायचे, त्याप्रमाणे उडीसामधून व्यापारासाठी इतर देशांमध्ये जाण्यासाठी, त्यांच्यामध्ये धर्मप्रसार करण्यासाठी जथ्थेच्या जथ्थे बाहेर पडायचे, ते त्रिपुरी पौर्णिमेच्या दिवशी नदीपूजेनंतर. कारण साधारणत: भारताच्या पूर्व किनाऱ्यावरून येणारी वादळे त्रिपुरी पौर्णिमेनंतर येत नाहीत आणि मग समुद्र पर्यटनाला भारताचा पूर्व किनारा मोकळा होतो. म्हणून ज्यांना समुद्रावरून परदेशी जाणं आवश्यक आहे ते त्रिपुरी पौर्णिमेला बाहेर पडायचे.

आपल्या लोकभाषेमध्ये 'आखादी' म्हणजेच अक्षय-तृतीयतेचा दिवस. या तृतीयेच्या नावात 'अक्षय' हा शब्द कसा आला? जशी घटस्थापना ही संकल्पना तलावांमध्ये पाणी पूर्ण भरण्यामधून आली, तसे 'अक्षय' हा शब्द ते पाणी टिकवण्यावरून आला. पावसाळा संपल्यानंतर आपल्या शेतीला-दैनंदिन कार्याला लागणारं पाणी घटस्थापनेला कुशलतेने नीट नियोजन करून, त्याच्या वापराची नीट सामुहिक पद्धत बसवली, उधळपट्टी होऊ दिली नाही तर वैशाख महिन्यापर्यंत नीट पुरू शकते. त्याची साक्ष म्हणून आपण अक्षय्यतृतीयेला कलशपूजा करतो. माझं पाणी मला पुरलं, त्याचा तो आनंद आहे. आपल्या जैन संप्रदायामध्ये अक्षयतृतीयेला मस्तकाभिषेक करण्याची परंपरा आहे. हे त्या आनंदाचे व्यक्त स्वरुप आहे. आपल्या मनांत जे आदरभाव असतात, ते अशाप्रकारे व्यक्त केले जातात. पाण्याशी असणारे हे नाते आपल्या परंपरेत किती घट्ट आहे याची आपण आणखी दोन उदाहरणे पाहू. भारतीय परंपरेमध्ये विद्येची उपासना करणाऱ्याला आशीर्वाद देणारी देवता आहे - 'शारदा'. शारदा म्हणजेच सरस्वती. 'सरस्वती' शब्द मुळात कोठून आला? 'सरस' शब्दाचा अर्थ आहे तलाव. तलावाच्या काठी

जी नेहमी असते ती सरस्वती. सरस्वती तलावाच्या काठी नाही, असं चित्र किंवा मूर्ती कुठेही सापडणार नाही. त्या सरस्वतीभोवती मोर, पक्षी, हंस बागडत असतात. पाण्याच्या भोवती प्राणिजीवन, मानवी जीवन विकसित झाले आहे, त्याची अभिव्यक्ती बौद्धिक क्षेत्रात आपण सरस्वतीच्या माध्यमातून केली आहे.

जगातले अप्रतिम शिल्प - कैलासलेणे - वेरुळला आहे. त्या कैलासलेण्यात प्रवेश केल्याकेल्या आपल्या मनावर कायम ठसा उमटवेल असे एक शिल्पचित्र समोरच आहे. ते शिल्पचित्र कोरलेल्या दगडांमध्ये, तलावाच्या पाण्यावर तरंगत असणाऱ्या कमळावर बसलेल्या लक्ष्मीचे आहे. लक्ष्मीच्या दोन्ही बाजूंना दोन मोठाले हत्ती त्यांच्या सोंडेतून लक्ष्मीवर पाण्याचा वर्षाव करत आहेत. राष्ट्रकुटांच्या काळात ते शिवमंदिर बांधलेले आहे. तुमच्या-आमच्यासारख्याला हिमालयांतील कैलासशिखराचे दर्शन घडले नाही तर ते वेरुळला वेगळ्या पद्धतीने व्हावे, अशी त्या शिखराची व मंदिराची रचना केलेली आहे. पण या शिवाच्या मंदिराच्या प्रवेशद्वारी चित्र मात्र लक्ष्मीचे आहे. त्या लक्ष्मीवर हत्ती सोंडेमधून पाण्याचा वर्षाव करताहेत. म्हणजे तो शिल्पकलाकारसुद्धा पाण्याच्या विपुलतेशी संलग्न असलेल्या लक्ष्मीचं रूप समोर ठेवतोय. अशा रीतीने आपल्या समाजाची सांस्कृतिक बांधणी ही पाणी, पाऊस, वर्षा ऋतू यांच्या आधारावर उभी आहे.

निसर्गाशी हे आपले नाते कुठपर्यंत बांधले गेलेले आहे? आपण सहजपणे कोणालाही विचारतो की अरे तू किती 'वर्षाचा' आहेस? वर्षा म्हणजे पावसाळा. त्याला अनुसरून आपण सहज म्हणतो, "मी अनेक पावसाळे पाहिले आहेत." म्हणजे किती पावसाळे पाहिले याच्यावर आपण आयुष्य मोजतो. इतका 'वर्ष' हा शब्द भारतीय समाज जीवनात रुढ झालेला आहे.

पाणी ह्या अर्थाचे आपल्या भाषेमधले शब्द पाहू या. मूळ शब्द आहे 'आप.' पंचमहाभूतांमधल्या या तत्त्वाचे आपल्या सामान्य व्यवहारात जे रुप दिसते, त्याला आपण 'जल' म्हणतो. हे आपतत्त्वाचे दृश्य स्वरुप आहे. तेच तत्त्व वाफ या रूपातही असतं. बाष्परूपातले हेच तत्त्व हिम म्हणजे बर्फरूपातही असतं. युरोपीय वाङ्मयामध्ये तेथील सगळ्या भाषांच्या म्हणजे केवळ इंग्रजीच्या नव्हे तर इंग्रजी, जर्मन, रशियन, या सगळ्या भाषांमध्ये पाणी संकल्पना व्यक्त करणारे फक्त तीन शब्द आहेत. वॉटर, ॲक्वा आणि हायड्रो. जल-संकल्पना व्यक्त करणारे आपल्याकडे कितीतरी शब्द आहेत. उदाहरणार्थ उदक. उत्कर्ष, उत्थापन, उत्सव. त्यातला संस्कृतमधला समान उपसर्ग आहे उद्. माणसाला उन्नत करणारा, वर उचलणारा जलतत्त्वाचा जो गुण आहे, तो उदक शब्दातून व्यक्त होतो. आपण धरणात उदक साठवले आहे, असे म्हणत नाही पण आपण उदकशांती करतो. पाण्यामध्ये सर्वांना बरोबर घेण्याची शक्ती आहे. त्यांत प्रदूषण असणारे पदार्थसुद्धा आले. आपण जलासाठी 'वारी' हा सर्वांना सामावून घेण्याचा गुण दर्शवणारा शब्द वापरतो.

संस्कृतमध्ये मूळ शब्द आहे 'पानीय', पिण्यासाठी लागणारा पदार्थ म्हणजे पाणी. आपण 'जल' ह्या शब्दाला समानार्थी शब्द म्हणून तो सरसकट वापरतो. पाण्यावर तरंग आहेत, पाण्याचे उसळणे आहे, पाण्याची जी घुसळण आहे, हे सगळे 'सलील' ह्या

साहित्यिक शब्दांतून व्यक्त होते. सलील हा शब्द क्रीडाप्रवणतेच्या संदर्भात काळजीपूर्वक वापरतो. आपण जल अभियंत्याला हा सलील अभियंता झाला असे म्हणत नाही. पाण्याला अंबु, नीर असे पर्यायी शब्द आहेत. पण ह्या शब्दांच्या अर्थाची छटा वेगळी आहे. पाणी ह्या पदार्थाचे आपल्या जीवनामध्ये, विचारांमध्ये, उत्सवांमध्ये, सामाजिक चालीरितींमध्ये, साहित्यामध्ये सखोल चिंतन झाले आहे. त्याचेच प्रतिबिंब या विविध शब्दांमधून आपल्याला दिसते.

भगवान बुद्ध हे तरुण राजपुत्र असताना एक मोठे संकट उभे राहिले. त्यांच्या आणि शेजारच्या राज्यामध्ये सीमेवरच्या नदीच्या पाण्याचा उपयोग कसा करावा, याबाबत कडाक्याचा वाद होता. अनेक वर्ष चाललेला हा वाद शेजारच्या राज्यावर आक्रमण करून लढाई केल्याशिवाय मिटणार नाही, असे भगवान बुद्ध ज्या राज्याचे घटक होते, त्यातल्या धुरीणांनी ठरवले. निसर्गाशी आपलं नातं लढाईने सोडवायचं नसते. त्यासाठी समन्वयाची, समजूतदारपणाची भूमिका घ्यायला हवी, असे भगवान बुद्धांनी त्यांना खूप समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. पण त्या काळामध्ये इतर लोकांना ते पटेना, तेव्हा भगवान बुद्धांनी त्या राज्याचा त्याग केला. ते प्रदीर्घ चिंतनाला निघून गेले. बुद्धत्वप्राप्तीनंतर बोधिसत्त्व म्हणून समाजाच्या मार्गदर्शनासाठी दीर्घकाळ कार्यरत राहिले. हा आपला पाण्याचा सांस्कृतिक वारसा आपण नेहमी लक्षात ठेवायला पाहिजे.

विदेशी समाजांमध्ये पाण्याबद्दल सांस्कृतिक धारा एकदम वेगळी आहे. त्याचे आणखी एक मजेशीर उदाहरण सांगतो. इंग्रजीमध्ये नदीला 'रिव्हर' हा शब्द आहे. हा शब्द लॅटीनमध्ये 'रिवस' म्हणून शब्द आहे, त्यातून आला आहे. पण रिवस या मूळ लॅटीन शब्दातून एका बाजूला 'रिव्हर' हा शब्द आला आणि दुसराही एक शब्द आला, 'रायव्हलरी.' म्हणजे नदी ही एक भांडणाची वस्तू आहे. अशी ही रोमन परंपरा तयार झाली. आपल्याकडे नदीला खूप नावे आहेत. अपूर्वा आहे, सरिता आहे. पण कुठल्याही शब्दाचा अर्थ भांडण अशा प्रकारचा होत नाही.

आपण चीनमध्ये गेलात, युरोपमध्ये गेलात, अमेरिकेत गेलात, तर एखाद्या चिनी कन्यकेचे नांव कु. यांगत्स्ये किंवा युरोपमधील एखाद्या महिलेचे नाव श्रीमती ऱ्हाईन किंवा अमेरिकन मुलीचे नाव मिसेस मिसिसिपी असे ठेवले आहे, असे सापडणार नाही. पण आपण आवडीने गंगा, गोदावरी, सिंधु, नर्मदा, कावेरी ही आपल्या मुलींची-पत्नीची नावे ठेवतो. नदीची आठवण करताना, उल्लेख करताना आपण माता म्हणून आदराने उल्लेख करतो. आपण त्या नदीकडे ज्या जिव्हाळ्याने पाहतो, ज्या आत्मीयतेने पाहतो ते भारतीय संस्कृतीचे अगदी वेगळे वैशिष्ट्य आहे. या वैशिष्ट्याला आपल्या पुढच्या सगळ्या वाटचालीमध्ये धक्का लागणार नाही ना?

निसर्गातील पर्यावरणाची चर्चा अभियंत्यांनी विशेषत्वाने करायला पाहिजे. कारण त्यांच्या पाण्याच्या वेगवेगळ्या हाताळणींमुळे - कारखाने, धरणे, शेती, वाफेवर चालणारी यंत्रे इ. सर्वांचा पर्यावरणावर परिणाम होत असतो. पर्यावरणाचे तीन प्रमुख घटक आहेत. हवा, पाणी आणि आकाश. ह्या तिघांना गुंफणारे तत्त्व पुन्हा पाणी हेच आहे. पाणी हे

आकाशात आहे. हे भूतलावर आहे आणि पाणी हे भूजल स्वरुपात पृथ्वीच्या पोटांतही आहे. ह्या सगळ्यांना गुंफणारे पाणी हे प्रवाही आहे.

ऐतिहासिक काळात आपण दक्षतापूर्वक पाण्याची गुणवत्ता सांभाळली होती. ती सांभाळण्यासाठी सामाजिक आचरणाचे काही नियमही बांधून घेतले होते. त्यामुळेच राजस्थानांतील तलावांच्या क्षेत्रांत जर जायचे असेल तर पादत्राणे ह्या स्रवणक्षेत्राच्या बाहेर ठेवून मगच त्या परिसरात जायला अनुमती मिळते.

आपण एखादे अरबी चित्र पाहिले, तर त्यांत कवी काव्य लिहिताना त्याच्याजवळ सुरई ठेवलेली दिसेल. अरबांच्या एखाद्या घराचे चित्र पाहिले तर तेथेही पाण्याची व्यवस्था म्हणून एखादी सुरई ठेवलेली दिसते. कुठल्याही भारतीय चित्रात अशी सुरई सापडणार नाही. युरोपीय चित्रांत युरोपियन राजे एकमेकांशी संवाद करताना, चषकातून मद्य देताना दिसतात. म्हणजे उघड्या तोंडाचा चषक हा युरोपीय संस्कृतीचे एक प्रतीक आहे. त्या ठिकाणी फार उष्णता नाही. त्यामुळे बाष्पीभवन कमी आहे. त्यामुळे त्यांची बादलीसुद्धा मोठ्या तोंडाची व आखूड बुडाची असते. आपल्याकडे पाणी वापरांच्या वस्तूंचा आकार कळशीचा होता. कळशी, सुरई आणि चषक ह्या तीन संस्कृती व तीन प्रकारचे हवामान व्यक्त करतात. हा त्यांतील संदेश.

कळस ह्या शब्दाचा अर्थ पाणी साठविणारे भांडे असा आहे. आपण मंदिर बांधतो, त्यावेळी सर्वात वरती कळस ठेवतो. आपण मंदिरावर छप्पर बांधले असे म्हणत नाही. कळसाशिवाय मंदिर पुरे होत नाही. एखादा माणूस खूप यशस्वी झाला की त्याच्या यशावर कळस झाला असे म्हणतो. सत्यनारायणाची पूजा ही कलशाची पूजा आहे. तेव्हा पाण्याचे संग्रहण करणे आणि ते आदराने साठवणे, धटींगणपणाने साठवणे नव्हे, तर सन्मानपूर्वक साठवणे ही भावना कलश संकल्पनेत व्यक्त होणारी आहे. या परंपरेचा नव्या आधुनिकतेशी आपल्याला संबंध जोडायचा आहे. एका बाजूला परंपरेने आलेला हा जलविकासाचा वारसा की ज्यातले अनेक तपशील आजच्यापेक्षा जास्त सूक्ष्म आहेत व आपल्याला नीट उलगडलेलेही नाहीत. आपल्याला ते मिळवण्यासाठी पाहणी करायला लागेल, माहितीचे विश्लेषण करायला लागेल. संशोधन करायला लागेल. आपल्याला, आपली परंपरा आणि नवीन अभियांत्रिकी ह्यात काय काय दुवे दिसतात किंवा परंपरागत समजुतीमध्ये कायकाय बदल आवश्यक वाटतात हेही पाहायचे आहे. आपल्या घरांत नळ असणे, वस्तीत नळ असणे हे आता आधुनिक जीवनाच्या मांडणीचे प्रतीक आहे. पूर्वी मोटेने पाणी काढले जात असे, आता आपल्याकडे पाणी उंच उचलण्याची नवी शक्ती हाताशी आहे. आपण पंप वापरतो. पंप हे पाण्याच्या आधुनिक व्यवस्थापनाचे अविभाज्य अंग झालेले आहे. अभियांत्रिकीच्या अशा नव्या उपलब्धतांना आपल्या सांस्कृतिक-वैचारिक मांडणीत आपण आदरपूर्वक स्थान अजूनही देऊ शकलेलो नाही. एखाद्या गावठाणात सर्वांसाठी समान नळ घेतलला असेल तर आपल्याला त्या नळाभोवती घाण दिसते, चिखल झालेला दिसतो. कारण आपल्या नव्या अभियांत्रिकीचा आपल्या जीवनाशी आदराचा, आत्मीयतेचा, गौरवाचा, शुचितेचा संबंध निर्माण केला गेलेला नाही. अशी हृद्य

नाती हा भारतीय परंपरेचा वारसा आहे. पण आपण तो आधुनिक अभियांत्रिकीशी जोडू शकलेलो नाही. ह्या संदर्भात मी आपले लक्ष एका नवीन अर्थपूर्ण बोधचिन्हाकडे वेधू इच्छितो. दिल्लीतून देशातील पाण्याचा सारा व्यवहार पाहणारी केंद्र सरकारची संघटना आहे - केंद्रीय जल आयोग. त्या कार्यालयाच्या दर्शनी भागातच त्यांच्या बोधचिन्हाची मोठी प्रतिकृती लावलेली आहे. त्या बोधचिन्हामध्ये पारंपरिक वारसा आणि आधुनिक अभियांत्रिकी ह्यांचा समन्वय दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्या बोधचिन्हावर कमळाच्या प्रफुल्लित पाकळ्या आहेत. एका पाकळीवर नळ आहे, एका पाकळीवर वीज वाहून नेणाऱ्या विजेच्या तारा आहेत. एका पाकळीवर धरण आहे. पाण्यासंदर्भातील अशा नव्या प्रकारच्या अभियांत्रिकी रचना कमळांच्या पाकळ्यांवर दाखविलेल्या आहेत. म्हणजेच आपल्याला आपली सांस्कृतिक मूल्ये आणि नवीन अभियांत्रिकी रचना ह्यांचा संगम करण्याचा, त्यांची सांगड घालण्याचा विचार करायला पाहिजे. मगच खऱ्या अर्थाने पाणी आणि संस्कृती जपली जाईल.

**भाषा-वार्ता**

१) दि. ६ मे, २०१९ रोजी फिक्कीतर्फे (फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्रीज) मराठीच्या आंतरजालीय भाषा-उपयोजनासंबंधी चर्चा करणारा कार्यक्रम झाला. त्यात सोनल कुलकर्णी-जोशी, आनन्द काटीकर, संदीप नुलकर, राजीवलोचन मराठे, विश्वास सरमुकादम व  सि-डॅकचे महेश कुलकर्णी यांनी सहभाग घेतला. एकंदरीतच मराठी भाषा महाजालावर वेगाने विस्तारणार असल्याने आता विविध उद्योग आणि संस्था भाषिक क्षेत्रातही उतरण्याची चिन्हे या चर्चेतून दिसली आहेत.

२) महाराष्ट्रातील गडचिरोली आणि छत्तीसगडमधील बस्तर भागातील आदिवासींच्या 'माडिया' भाषेतील लिखित स्वरूपातील पहिले पुस्तक पुणे विद्यापीठातील जर्मन भाषेच्या निवृत्त प्राध्यापिका डॉ. मंजिरी परांजपे आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी तयार केले आहे. या भाषेला लिपी नसल्याने आतापर्यंत दस्तऐवजीकरण झालेले नव्हते. म्हणूनच आदिवासींशी प्रत्यक्ष संवाद साधून हे पुस्तक तयार करण्यात आले असून, पुण्यात दि. १ जुलै, २०१९ रोजी त्या पुस्तकाचे प्रकाशन झाले.

३) मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने, दि. १९ ऑक्टोबर, २०१९ रोजी, सुप्रसिद्ध संस्कृत प्राध्यापक डॉ. सरोजा भाटे यांचे **पाणिनीय व्याकरणाचा मराठी व्याकरणावरील प्रभाव** या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. फर्ग्युसन महाविद्यालयात झालेल्या या व्याख्यानात भाटे बाईंनी कॅरीपासून खंडेराव कुलकर्णी यांच्यापर्यंतच्या सर्व व्याकरणांचा धावता आढावा घेतला. मराठी व्याकरणात; अमराठी लेखकांचा (कॅरी) पहिला, मराठी भाषाभ्यासकांचा (दादोबा) दुसरा आणि आधुनिक भाषावैज्ञानिकांचा तिसरा, असे ३ संप्रदाय अस्तित्वात असल्याचे सोदाहरण दर्शवले.

# ल. रा. नसिराबादकर : समाजमनस्क वाङ्मयोपासक

- नंदकुमार मोरे

१

दि. ४ डिसेंबर, २०१८ रोजी दिवंगत झालेले डॉ. ल. रा. नसिराबादकर शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागातून प्राध्यापक आणि विभागप्रमुख म्हणून सेवानिवृत्त झाले. मध्ययुगीन मराठी साहित्य, एकोणिसाव्या शतकातील मराठी वाङ्मय, सामाजिक दृष्टिकोनातून साहित्याचा अभ्यास, वाङ्मयेतिहास लेखन आणि भाषिक कौशल्यांचा अभ्यास हे त्यांचे विशेषज्ञतेचे विषय होते. या विषयांमध्ये त्यांनी सतत चिंतन आणि संशोधन केले. शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागामध्ये विद्यार्थ्यांमध्ये साहित्याकडे पाहण्याचा समाजशास्त्रीय दृष्टिकोन विकसित व्हावा, यासाठी विभागाचे पहिले विभागप्रमुख प्रा. गो. मा. पवार यांच्यापासून जाणीवपूर्वक प्रयत्न झाले. परिणामी 'सामाजिक दृष्टिकोनातून वाङ्मयाचा अभ्यास' ही अभ्यासपत्रिका महाराष्ट्रात सर्वप्रथम शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागात सुरू झाली. ल. रा. नसिराबादकरांनीही आपल्या सर्वच संशोधक विद्यार्थांकडून 'सामाजिक दृष्टिकोनातून साहित्याचा अभ्यास' या सूत्रास अनुसरून प्रबंध आणि प्रबंधिकांचे लेखन करून घेतले. दहा विद्यार्थ्यांकडून वेगवेगळ्या विषयांवर पीएच. डी. पदवीसाठीचे; तर बावीस विद्यार्थ्यांकडून एम. फिल. पदवीसाठीचे संशोधन करून घेतले. १९९४मध्ये त्यांनी महाराष्ट्रात सर्वप्रथम 'व्यावहारिक मराठी पदविका' हा स्वतंत्र अभ्यासक्रम शिवाजी विद्यापीठाच्या विद्वत्सभेच्या मान्यतेने मराठी विभागात चालवला. त्यामुळे पदविकेसाठी मराठी भाषेत भाषिक कौशल्यांचा स्वतंत्र अभ्यासक्रम राबवणारे शिवाजी विद्यापीठ हे महाराष्ट्रातील पहिले विद्यापीठ ठरले. नसिराबादकरांनी अ.भा.मराठी साहित्य संमेलनांपासून महाराष्ट्रातील जवळपास सर्वच विद्यापीठांमध्ये महत्त्वाच्या विषयावर शोधनिबंध वाचले. असंख्य विषयांवर उद्बोधक व्याख्याने दिली. त्यांच्या नावावर स्वतंत्र आणि संपादित असे सुमारे दहा ग्रंथ आहेत. त्यामध्ये 'प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास', 'आचार्य अत्रे : साहित्यदर्शन', 'व्यावहारिक मराठी' हे स्वतंत्र तर 'नव्या उर्मी-नवी क्षितिजे' (गं. बा. सरदारांचे निवडक लेख), 'निवडक लोकहितवादी',' महाराष्ट्राचे लोकनाथ : संत एकनाथ', 'महाद्वाराच्या पायरीशी', 'ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी', 'प्रबोधनाचा पूर्वरंग' इत्यादी ग्रंथ त्यांनी हे. वि. इनामदार, निर्मलकुमार फडकुले, मो. स. गोसावी. नि. ना. रेळेकर या मान्यवर अभ्यासकांसोबत संपादित केले आहेत. ते एकूणच विद्यार्थिप्रिय, व्यासंगी आणि बहुआयामी व्यक्तिमत्त्व म्हणून परिचित होते.

२

'मध्ययुगीन मराठी वाङ्मय' हा अभ्यासविषय डॉ. ल. रा. नसिराबादकर यांच्या विशेष आस्थेचा होता. साहित्याचा अभ्यास करणारा सर्वसामान्य विद्यार्थी डोळ्यासमोर ठेवून त्यांनी अतिशय आत्मीयतेने 'प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास' हा ग्रंथ लिहिला आहे. मराठी साहित्याच्या सुमारे सातशे वर्षांच्या इतिहासाचा विशाल पट त्यांनी या ग्रंथात

अतिशय नेमकेपणाने मांडला आहे. त्यामुळे हा इतिहास संक्षिप्तपणे लिहिलेला असला तरी, समग्रतेकडे जाणारा ठरला आहे. प्राचीन मराठी वाङ्मयातील विविध प्रवृत्तींचा शोध घेत, त्यांनी आपली मांडणी केली आहे. महाराष्ट्राची पूर्वकथा आणि मराठी भाषेच्या उत्पत्ती-विचारापासून त्यांनी चर्चेला सुरूवात केली आहे. नाथ, महानुभाव, वारकरी, दत्त आणि समर्थ संप्रदायाच्या वाङ्मय-निर्मितीबरोबरच वीरशैव आणि नागेश संप्रदायांच्या वाङ्मयनिर्मितीचा घेतलेला परामर्श, हे या पुस्तकाचे एक वैशिष्ट्य आहे. महानुभावांच्या महत्त्वाच्या ग्रंथपरिचयानंतर नसिराबादकरांनी ज्ञानदेव आणि नामदेवांवर दीर्घ प्रकरणे लिहिली आहेत. या रचनाकारांच्या काव्याचा परामर्श घेण्यापूर्वी त्यांनी तत्कालीन महाराष्ट्राचे वास्तवचित्र मांडले आहे. त्यातून तेराव्या शतकातील राजकीय, धार्मिक आणि सामाजिक परिस्थितीचे दर्शनच वाचकाला होते. वारकरी संप्रदायाच्या उभारणीचा विचार करताना हे दर्शन फार महत्त्वाचे आहे. कारण ज्ञानदेवादि रचनाकारांनी आपल्या लेखनाबाबत घेतलेल्या भूमिका आणि लेखनाच्या माध्यमातून केलेल्या कार्याची अर्थपूर्णता त्यामुळे ठसठशीतपणे अधोरेखित होते. तत्कालीन समाज अज्ञानी आणि मोहवश बनला होता. तो काम, क्रोध, मोह, लोभ याच्या आधीन होता. त्यांना सत्य, शांती, विवेक, वैराग्य आणि आत्मिक समाधान या गुणांची ओळख ज्ञानदेवांनी करून दिली.

तत्कालीन समाजाने धर्मश्रद्धेचा वेगळाच अर्थ घेतलेला होता. त्यातून या क्षेत्रात मोठा गोंधळ माजला होता. लोक भूत-भविष्य, जादूटोणा, जारणमारणमंत्रांदी गोष्टीत विशेष रस घेऊ लागले होते. बौद्ध, जैन आणि महानुभाव ह्या संप्रदायांनी वैदिकधर्माविरुद्ध बंड पुकारले होते. शिवाय या संप्रदायांच्या विचारांमुळे सामान्य माणूस भांबावला होता. परिणामी हे संप्रदाय बरेच शिथिल झाले होते. पंडितांचा वर्ग आपले पांडित्य आणि शब्दच्छल करण्यात गुंतला होता. सामान्य माणसाशी त्यांना काही देणेघेणे नव्हते. याबाबत स्वत: ज्ञानेश्वरांनीच ज्ञानेश्वरीच्या दहाव्या अध्यायात केलेले भाष्य नसिराबादकर यांनी नेमक्या शब्दात दिले आहे. एखाद्या साहित्यकाराची परिपूर्ण ओळख कशा प्रकारे करून द्यावी याचा आदर्श वस्तूपाठ त्यांनी मराठी वाङ्मयाला घालून दिला. कार्यकर्तृत्वाची ओळख करून देताना, त्यांच्या कार्यानुरूप दिलेली काव्यमय शीर्षके हे त्यांच्या लेखनाचे खास वैशिष्ट्य बनले आहे.

ज्ञानेश्वर-नामदेवांच्या कार्यकर्तृत्व परिचयानंतर त्यांनी सर्व जातीधर्मातील संतमेळा एकत्र गुंफला आहे. गोरा कुंभार, सावता माळी, नरहरी सोनार, चोखामेळा, सोयराबाई, बंका, निर्मळा, कर्ममेळा, सेना महाराज, मुक्ताबाई, जनाबाई, विसोबा खेचर यांच्यासह वीरशैव संप्रदायाचे योगदान त्यांनी नेमकेपणाने सांगितले आहे. पुढे एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम आणि समर्थ रामदासांवर सविस्तर भाष्य केले आहे. याबरोबरच काही जैन मराठी कवींचाही परिचय त्यांनी करून दिला आहे. वास्तविक या कालखंडातील वाङ्मयाचा इतिहास लिहिताना वाङ्मयाच्या इतिहासकारांनी जैन मराठी साहित्याची दखल घेतलेली नाही. तत्कालीन जैन धर्मातील लेखकांनी प्राकृत आणि मराठीत केलेल्या रचना विपुल आणि महत्त्वपूर्ण आहेत. या साहित्याची यथायोग्य ती दखल मराठी साहित्याच्या

इतिहासात घेतल्यास मध्ययुगीन मराठी साहित्याचा इतिहास अधिक संपन्न आणि समृद्ध होणार आहे. त्यादृष्टीने काही कवींचा संक्षेपाने करून दिलेला परिचय विस्तारित करायला हवा होता. वास्तविक नसिराबादकरांनी हा इतिहास विद्यार्थी डोळ्यासमोर ठेवून परिचयात्मक स्वरूपात लिहिल्याने काही मर्यादा पडणे स्वाभाविक आहे. तरीही तत्कालीन समाजातील उपेक्षित कवींवर विशेष लक्ष देऊन त्यांच्या साहित्यिक योगदानाची योग्य दखल नसिराबादकरांनी घेतल्याने अठरापगड जातींमध्ये विभागलेला संतमेळा नेमकेपणाने वाचकांच्या समोर उभा राहतो.

संतमेळ्याच्या परिचयानंतर त्यांनी पंडिती परंपरेतील काव्याची ओळख करून दिली आहे. त्यामध्ये कवी आणि त्यांच्या महत्त्वपूर्ण रचनांची त्यांनी यथायोग्य नोंद घेतली आहे. या सर्व नोंदीनंतर तत्कालीन कवींनी लिहिलेल्या संतचरित्रांचा परिचय करून दिला आहे. मराठीतील शाहिरी काव्य आणि बखर गद्य हे अनेकार्थाने फार मौलिक आणि महत्त्वपूर्ण वाङ्मय आहे. महाराष्ट्राच्या भाषिक, सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय अभ्यासाचे साधन म्हणून या साहित्याकडे सर्वच क्षेत्रातील अभ्यासकांना यावे लागते. इतिहास, राज्यशास्त्र, समाजशास्त्र यासारख्या विद्याशाखांमध्ये बऱ्याचवेळा शाहिरी काव्य, बखर वाङ्मय ही दुय्यम-तिय्यम प्रतीची साधने असल्याचे नोंदवले जाते. परंतु, प्राचीन भारताच्या दळणवळणाचा महत्त्वपूर्ण अभ्यास करणाऱ्या हिंदीतील 'सार्थवाह' या ग्रंथाचे लेखक मोतीचंद्र यांनी बहुतांश संदर्भ अशाच साहित्यकृतींतूनच मिळवले आहेत. त्यामुळे या अभ्यासक्षेत्रांमध्ये मौलिक भर घालण्याइतका दस्तऐवज अशा साहित्यकृतींमध्ये असल्याचे यावरून लक्षात येते. मराठी भाषा आणि साहित्याच्या अभ्यासासाठी फार मौलिक आहेत. त्यादृष्टीने या साहित्याचा नेमका परिचय ल. रा. नसिराबादकर यांनी करून दिला आहे. या वाङ्मयेतिहासाच्या शेवटी नसिराबादकरांनी या सबंध कालखंडातील ग्रंथकारांची आणि ग्रंथांची स्थूल सूची बनवली आहे. ही सूची या कालखंडाच्या अभ्यासकांना नक्कीच दिशादर्शक ठरणारी आहे. अशा पद्धतीच्या सूचीमुळे नसिराबादकरांची संशोधनशिस्तही लक्षात येते.

वर म्हटल्याप्रमाणे हा वाङ्मयेतिहास परिचयात्मक आणि बऱ्याचअंशी धावता आहे. तथापि, त्यांनी या इतिहासलेखनातून अतिशय नेमक्या शब्दांमध्ये जवळपास एक हजार वर्षांतील महाराष्ट्राचे चित्र उभे करण्याचा प्रयत्न केला आहे. सदर पुस्तक अभ्यासक्रमाचा भाग म्हणून लिहिलेले असले तरी, या कालखंडातील साहित्याचा नेमका परिचय करून देणारे आहे. त्यामुळे अशा परिचयात अनेक नावे आणि ग्रंथाचा उल्लेख सुटण्याची शक्यता असते. अलीकडच्या काही वर्षांमध्ये वाङ्मयेतिहासाच्या पुनर्लेखनाबाबत वारंवार चर्चा होताना दिसते. त्यानुसार या कालखंडाचे पुनर्लेखन झाल्यास या इतिहासात अनेक नावांची आणि संप्रदायांची ठळकपणे भर नक्कीच पडू शकेल.

३

मध्ययुगीन कालखंडातील अलक्षित आणि समाजाकडून उपेक्षिलेल्या संतमेळ्याची स्वतंत्र दखल त्यांनी 'महाद्वाराच्या पायरीशी' या ग्रंथाच्या माध्यमातून घेतली आहे. या

ग्रंथात चोखामेळा, सोयराबाई, बंका, निर्मळा, कर्ममेळा, भागू, कान्होपात्रा आणि जनाबाई यांच्या अभंगसंहितेची चर्चा आहे. आपल्या संपादकीय निवेदनात या ग्रंथाच्या रचनेबाबत आपली भूमिका स्पष्ट करताना नसिराबादकर लिहितात, “ज्ञानदेव-नामदेववादी थोर संतांचे विचार ज्यांनी आपले जीवन पाथेय बनविले, उपेक्षेचे दुःख गिळत गावगाड्यातील कठोर वास्तवाला जे सामोरे गेले आणि तरीही अंतरंगातली भक्तीची ज्योत तेवत ठेवून ज्यांनी मराठीतील भावकविता संपन्न केली, अशा प्राचीन मराठीतील उपेक्षित संतकवींच्या अभंगवाणीचे हे संपादन.” संत साहित्यातील अनुभवांची कक्षा या कवितेने रुंदावली. तत्कालीन समाजात ज्ञानापासून वंचित ठेवलेल्या आणि विषमतेचे बळी ठरलेल्या समाजाचे प्रतिनिधित्व हा संतमेळा करतो. त्यांच्या रचना वाचताना तत्कालीन महाराष्ट्रातील अठरापगड जातीतील लोक कसे कुचंबलेले जीवन जगत होते, याचा प्रत्यय येतो. तत्कालीन उपेक्षित समाजाला आत्मोन्नतीची वाट ज्या संतांनी दाखवली त्यांचेही कार्य प्रस्तुत ग्रंथातील संतांच्या रचना वाचताना उजळून निघते. या सर्व रचना म्हणजे विषमतेच्या चिखलात रुतलेल्या, उपेक्षित हृदयाची विठ्ठलाला दिलेली आर्त हाक आहे. या समाजाचे दुःख समाज ऐकून घेण्याच्या मन:स्थितीत नव्हता. अशावेळी यांना विठ्ठल हीच मन मोकळं करण्याची जागा होती.

चोखामेळ्यापासून जनाबाईपर्यंत उपेक्षेच्या विळख्यात अडकलले सारे रचनाकार मराठी साहित्यातील महत्त्वाचे कवी आहेत. या रचनांमुळे महाराष्ट्राचे तत्कालीन सामाजिक आणि सांस्कृतिक जीवन सर्वांसमोर उभे राहू शकले. कारण उच्चनीचता आणि वर्णव्यवस्था हा तत्कालीन गावगाड्याचा स्थायिभाव बनला होता. गावगाड्याला पडलेला हा अनिष्ट विळखा सैल करण्याचे महत्त्वाचे काम वारकरी परंपरेने केले. चंद्रभागेच्या वाळवंटात रुजलेले जातीपातींचे मुक्त वातावरण महाराष्ट्रभर वारकऱ्यांच्या माध्यमातूनच पसरू लागले. तथापि, नसिराबादकरांचे “महाराष्ट्रात तेराव्या शतकात चंद्रभागेच्या तीरी आध्यात्मिक लोकशाही उदयाला आली”, हे विधान मर्यादित अर्थानेच घ्यायला हवे. या लोकशाहीतल्या संतांना भक्तीचा हक्क मिळाला असला, तरी हीनयातित्वामुळे, कधी प्रतिष्ठेच्या आणि व्यवसायाच्या विकृत कल्पनांमुळे त्यांची उपेक्षा चालूच राहिली. गाभाऱ्यात जाऊन विठोबाचे साजिरेगोजिरे श्रीमुख त्यांना पाहता आले नाही, त्याच्या चरणावर माथा टेकता आला नाही. विठ्ठलाच्या सगुण दर्शनाच्या सोहळ्याचा त्यांनी आनंद घेतला, तो पायरीवरूनच. मनातली आर्तता डोळ्यात ठेवून ही संतमंडळी महाद्वाराशीच तिष्ठत राहिली. (प्रस्तावना/पृष्ठ चार) हे नसिराबादकरांचे निरीक्षण वारकरी संप्रदायाचे व्यवच्छेदक विश्लेषण करणारे म्हणून महत्त्वाचे वाटते. तथापि, जाती आणि रुढीग्रस्त समाजात या उपेक्षित समाजातील वारकऱ्यांना वारकरी संप्रदायाने जवळ केले. त्यामुळेच विठ्ठल आणि ज्ञानदेवादि पूर्वसुरींवरील निष्ठा या उपेक्षित समाजांतील कवीनी अंत:करणातून व्यक्त केली आहे.

समाजात अतिशय वाईट वागणूक मिळणाऱ्या या संतमंडळींनी वारकरी संप्रदायात येऊन आत्मविकास साधला. येथेच त्यांना बऱ्यावाईट गोष्टींचा विचार करण्याचे

बळ आले. त्यासंदर्भातील या संताचे कार्य प्रस्तुत संपादनातून समोर आणले आहे. त्यामुळे 'महाद्वाराच्या पायरीशी' हे संपादन अनेकार्थाने महत्त्वपूर्ण आहे. कारण या संपादनातील संतांच्या अभंगांतून उपेक्षित आणि गावकुसाबाहेरच्या समाजांचे दुःख सर्वप्रथम जगासमोर आले. संतकवितेच्या अनुभवकक्षा या कवितेने विस्तारल्या. नवे जीवनदर्शन घडले. उपेक्षितांच्या वाट्याला येणाऱ्या दुःखाच्या नानाविध तऱ्हा इतरांना कळू लागल्या. चोखामेळा यांनी आपल्या अभंगातून हीन जातीत जन्मल्यामुळे वाट्याला आलेल्या भोगाचे दर्शन घडवले. चोखोबाप्रमाणेच त्यांची पत्नी सोयराबाई यांच्याही रचनांचे स्वरूप काहीसं असेच आहे. चोखोबा आणि सोयराबाई यांचा काळ पाहता, त्यांनी केलेल्या रचना, त्यातून व्यक्त केलेला भाव आणि त्यांचे दुःख तत्कालीन समाजाच्या अभ्यासाचे एक महत्त्वाचे साधन ठरते. चोखोबांची धाकटी बहीण निर्मळा व चोखोबांचा मेहुणा बंका महार यांचेही अभंग या संपादनात समाविष्ट केले आहेत. एकाच कुटुंबात रुजलेल्या भक्तिसंप्रदायाची विविध रूपे म्हणूनही हे सारे अभंग अभ्यसनीय आहेत. वास्तविक चोखोबाच्या कुटुंबात काही पिढ्यांपासून विठ्ठलभक्ती होती. भक्ती करण्याचा अधिकार सर्व जाती-धर्मातील लोकांना होता. परंतु, जातिग्रस्त मनांनी निर्माण केलेली जातीची उतरंड पुढे अशा समाजातील लोकांच्या भक्तीची विटंबनाच करू लागली. या अभंगांचे गुणविशेष सांगताना नसिराबादकर लिहितात, "सकलसंतगाथ्यात बंकाचे फक्त एकोणचाळीस अभंग आहेत. चोखोबांच्या कुटुंबियांत बंकाची अभंगवाणी अधिक काव्यात्म असून चित्रमयता हा तिचा विशेष आहे." (प्रस्तावना/एकोणीस) हे संतमंडळ जेवढे प्रगल्भ जाणिवा व्यक्त करणारे आहे, तेवढेच ते स्वतःच्या अंतःकरणातील शल्य व्यक्त करीत संताप आणि बंडखोरीची भाषा वापरणारे आहे. यासंदर्भाने या संपादनातील कर्ममेळ्याची अभंगावाणी पाहता येईल. 'आमुची केली हीन याती। तुज का न कळे श्रीपती।।, जन्म गेला उष्टें खातां।लाज न ये तुमचे चित्ता।।' सारखे त्याचे अभंग यादृष्टीने अभ्यासता येतील.

या संपादनाला जोडलेली बत्तीस पानांची दीर्घ प्रस्तावना संत साहित्याच्या अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. संत-परंपरेमध्ये उपेक्षित समाजातील संतांचे अभंग नेमके काय सांगू पाहतात, या संताची विठ्ठलाला मारलेल्या अनेकार्थी आर्त हाकेची चर्चा ह्या प्रस्तावनेत सविस्तरपणे केली आहे. एकूणच हे संपादन नसिराबादकर यांचा संत परंपरेकडे पाहण्याचा दृष्टिकोन स्पष्ट करणारे आहे. ते उपेक्षित समाजाच्या अभ्यासामध्ये रुची असलेले अभ्यासक होते. त्यांनी पुणे विद्यापीठाला पीएच.डी. पदवीसाठी सादर केलेला प्रबंधच 'सामाजिकदृष्ट्या उपेक्षितांच्या जीवनाचे मराठी ललित वाङ्मयातील चित्रण' असा आहे. त्यावरून त्यांची वाङ्मयव्यवहाराकडे पाहण्याची दृष्टी लक्षात येते.

४

या संपादनाबरोबर मध्ययुगीन मराठी साहित्यातील ज्ञानेश्वर आणि एकनाथ या संतपरंपरेतील दोन महत्त्वाच्या रचनाकारांवर त्यांनी स्वतंत्र ग्रंथ संपादित केले आहेत. नि. ना. रेळेकर यांच्यासोबत संपादित केलेला 'ग्रंथश्रेष्ठ ज्ञानदेवी' हा हे. वि. इनामदार सद्भाव ग्रंथही त्यांची संत साहित्याकडे पाहण्याची दृष्टी स्पष्ट करणारा आहे. ज्ञानेश्वरांवर अठ्ठावीस

लेखांचे संकलन असलेला सुमारे चारशे पृष्ठांचा ग्रंथ नसिराबादकर यांनी संपादित केला असून; या ग्रंथातून ज्ञानेश्वरीचे श्रेष्ठपण वाचकांच्या मनावर बिंबवले आहे. ज्ञानेश्वरीच्या संहितानिश्चितीबाबत उल्लेखनीय संशोधन केलेले आणि ज्ञानेश्वरीची संहिता संपादित करून शिवाजी विद्यापीठातर्फे प्रकाशित केलेले ज्येष्ठ अभ्यासक पां. ना. कुलकर्णी यांनी 'श्री ज्ञानेश्वरी-संहितानिश्चितीची दिशा' हा महत्त्वाचा लेख उपरोक्त ग्रंथात समाविष्ठ आहे. ज्ञानेश्वरीच्या संहितेसंदर्भातील वादप्रतिवादा-विषयक सांगोपांग चर्चा या लेखामध्ये करण्यात आली आहे. वि.का.राजवाडे आणि इतर अभ्यासकांचे याबाबतचे संशोधन, विवेचन याचा परामर्श या लेखामध्ये घेण्यात आला आहे. ज्ञानेश्वरीमागील काव्यप्रेरणांचा शोध, ओव्यांमधील काव्यसौंदर्य, ज्ञानेश्वरांची काव्यशैली याबरोबर ज्ञानेश्वरीतून व्यक्त होणारे ज्ञानेश्वरांचे व्यक्तिमत्त्व, त्यातील कृष्णार्जुन ही पात्रे, आणि ज्ञानेश्वरीची फलश्रुती असे अनेक अंगांनी लिहिलेले महत्त्वाचे लेख या ग्रंथात एकत्रित करण्यात आलेले आहेत. ज्ञानेश्वरांनी लिहिलेल्या ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि चांगदेवपासष्टी अशा रचनांचा आढावा घेणारा वा.पु.गिंडे यांचा लेखही वैशिष्ट्यपूर्ण आहे. ज्ञानेश्वरांचा वारकरी संप्रदायावरील प्रभाव आणि ज्ञानेश्वरीतील भक्तीकल्पनेला केंद्रवर्ती ठेवत केलली चर्चा, हे या ग्रंथाचे महत्त्वाचे वैशिष्ट्ये आहे. या ग्रंथाबरोबरच 'महाराष्ट्राचे लोकनाथ : संत एकनाथ' हे हे.वि.इनामदार आणि मो.स.गोसावी यांच्या सोबत केलेले दोनशेहून अधिक पृष्ठांचे संपादन वैशिष्ट्यपूर्ण आहे. संत एकनाथांचे इतर संताशी असलेले नाते स्पष्ट करणारा भाग अतिशय हृद्य आहे. भानुदास आणि एकनाथ, श्रीजनार्दनस्वामी आणि एकनाथ, एकनाथ आणि मुक्तेश्वर, नामदेव आणि एकनाथ, एकनाथपंचक ह्या लेखांतून संतांमधील परस्पर नातेसंबंधाचा विस्तृत पट उलगडून दाखवला आहे. संतांचे एकमेकांशी जोडून घेणे, एकमेकांना लळा लावणे, जातीधर्मापलीकडे जाऊन गुरूशिष्याचे नाते प्रस्थापित करणे या संदर्भाने येणारे सारे चिंतन वाचनीय आहे. त्याशिवाय नाथांची काव्यदृष्टी, भाषासौंदर्य, जीवनदृष्टी याबाबत साकल्याने विचार या ग्रंथात झाला आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीवर असणाऱ्या संतांच्या ऋणाचे विवेचन करणारा गं.बा.सरदारांचा 'नाथांची सांस्कृतिक कामगिरी' हा लेख महत्त्वाचा आहे.

तत्कालीन संतसाहित्याचे सर्व महत्त्वाचे अभ्यासक ज्ञानेश्वर आणि नामदेवांविषयी कोणत्या आयामातून विचार करतात, हे समजून घेण्यासाठी सदर संपादने उपयुक्त ठरतात. पा.ना.कुलकर्णी, अलका इनामदार, सुहासिनी इर्लेकर, म.सु.पाटील, कल्याण काळे, मु.श्री. कानडे, निर्मलकुमार फडकुले, गो. म. कुलकर्णी, अशोक कामत, अंजली सोमण, यु.म.पठाण, मुकुंद दातार, वि.बा.प्रभुदेसाई, प्र.ल.गावडे, भाऊ धर्माधिकारी, वि.शं.चौगुले या महत्त्वाच्या अभ्यासकांचे लेख यासंदर्भाने अभ्यसनीय आहेत. संतसाहित्याच्या अभ्यासासाठी आयुष्य वाहिलेल्या इनामदार यांच्यासारख्या अभ्यासकांविषयीचा सद्भाव व्यक्त करण्यासाठी सदर ग्रंथ संपादित करण्यात आले आहेत. नसिराबादकरांचे मध्ययुगीन कालखंडातील काम पाहताना संत तुकारामांवर त्यांनी स्वतंत्र काम न केल्याचे शल्य वाटते. तथापि, शिवाजी विद्यापीठात संत तुकाराम अध्यासनाची स्थापना व्हावी यासाठी ते

जाणीवपूर्वक प्रयत्नशील होते. त्यांच्या कार्यकालातच शिवाजी विद्यापीठामध्ये तुकाराम अध्यासनाची मुहुर्तमेढ रोवण्यात आली.

५

'आचार्य अत्रे : साहित्यदर्शन' हा आचार्य अत्र्यांच्या साहित्याचे आणि त्यांच्या कार्यकर्तृत्वाचे विवेचन करणारा नसिराबादकरांचा महत्त्वाचा ग्रंथ आहे. आचार्य अत्रे बहुआयामी व्यक्तिमत्त्व म्हणून सर्वज्ञात होते. त्यांनी केवळ साहित्य क्षेत्रातच नाही, तर पत्रकारिता, चित्रपट आणि सामाजिक-राजकीय चळवळींमध्येही भरीव योगदान दिले आहे. प्रसंगी कारावास भोगला आहे. प्रतिभावंत कवी आणि विडंबनकार, विनोदी आणि गंभीर या दोन्ही प्रकारात ताकदीने लेखन करणारे सिद्धहस्त लेखक, नाटककार, पत्रकार, चित्रपटकार अशा अनेक अंगाने त्यांचे व्यक्तिमत्त्व जाणून घ्यावे लागते. त्यांचे पाच खंडात लिहिलेले आत्मचरित्र, शेकडो अग्रलेख, अनेक व्यक्तिचित्रे, मृत्यूलेख असे समग्र लेखन पाहता, त्यांच्या बहुआयामी लेखनाचा प्रत्यय येतो. अशा लेखकाच्या लेखनावर अनेक वर्षे काम करून नसिराबादकरांनी हा बृहद्ग्रंथ सिद्ध केला. या ग्रंथात त्यांनी अत्र्यांच्या जीवनाची वाटचाल अनेक अंगाने कशी झाली, हे स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. अत्रे यांच्या जीवनाची आणि साहित्याची वाटचाल प्रेरणादायी आहे. अतिशय संवेदनशील आणि समाजमनस्क असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते. ते कोणत्याही एका क्षेत्रात रमले नाहीत. ते मुळात चांगले शिक्षक तसेच चांगले नाटककारही होते. इतक्या वर्षांनंतरही अत्र्यांची नाटके हाऊसफुल्ल असतात, यावरून त्यांच्या लेखनाचे यश लक्षात येते. शिवाय महाराष्ट्रातील ते एक प्रसिद्ध वक्ते म्हणूनही लोकप्रिय होते. त्यांची भाषणे ऐकायला लोक दूरवरून येत. अत्र्यांनी जीवनात अनेक व्यवसाय केले. परंतु, आपल्या जीवनाची वाटचाल सांगताना 'जीवन हाच माझा व्यवसाय आहे.' असे ते गमतीने म्हणायचे. जीवनातील कोणताच विषय वर्ज्य नसणाऱ्या अत्रेंचे अवलिया व्यक्तिमत्त्व समजून घेण्याचे अवघड काम ल. रा. नसिराबादकर यांनी केलेआहे.

अत्र्यांवरील तीनशेहून अधिक पृष्ठांच्या ग्रंथामध्ये नसिराबादकर यांनी बारा प्रकरणातून अत्रे यांच्या साहित्याचा परामर्श घेतलेला आहे. त्यांना साहित्यक्षेत्रातील साकाळलेपणाबद्दल आणि अंधानुकरणाबाबत तीव्र नाराजी होती. म्हणून अत्र्यांनी निकोप साहित्यनिर्मितीसाठी विडंबनपर कविता केली. त्यांच्या विडंबनपर कवितेने अनेकांचे डोळे उघडले. अनेकांना नवी दृष्टी मिळाली. पुढे अनेकांनी अत्र्यांच्या शैलीची नक्कल करण्याचा प्रयत्न केला होता. कवी आणि विडंबनकार अत्रे या पहिल्या प्रकरणात अत्र्यांच्या कवितेचा आणि मराठीतील सर्वाधिक लोकप्रिय झालेल्या विडंबनपर कवितेचा विस्तृत विचार केला आहे. पुढे नाटककार अत्रे, अत्र्यांची आत्मचरित्रे, पत्रकार अत्रे, अत्रे यांचे कथनात्मक लेखन, अत्रे : विनोद आणि वक्तृत्व, अलिखित चरित्रे, प्रवासवर्णनकार अत्रे, अत्र्यांचे बालवाङ्मय या दहा प्रकरणांमधून अत्र्यांच्या लेखनाचा सारा पसारा मांडला आहे. अत्रे सर्वांसाठी लिहायचे. अत्रे जितके विनोदी तितकेच गंभीर प्रवृत्तीचे लेखक होते. त्यांचे अग्रलेख महाराष्ट्रीय लोकांच्या डोळ्यात अंजन घालणारे असायचे. त्यांनी आपल्या

लेखनातून केलेले प्रत्येक काम हेतूपुरस्सर होते. त्यामुळेच त्यांची नाटके, चित्रपट, पत्रकारिता, भाषणे हे अनेकांचे जीवन घडवण्याला सहाय्यभूत ठरले. त्यांनी स्वत:ची शैली जपली आणि ती लोकांच्या मनावर बिंबवली. या सर्वांचाच विस्तृत आढावा आणि एका लेखकाचा अभ्यास कसा करावा याचा वस्तूपाठच 'आचार्य अत्रे : साहित्यदर्शन' या पुस्तकाच्या माध्यमातून नसिराबादकरांनी घालून दिला आहे.

६

नसिराबादकरांच्या संपादनातील 'नवी उर्मी, नवी क्षितिजे' हा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ होय. मराठीतील ज्येष्ठ अभ्यासक, संशोधक आणि समीक्षक गं.बा.सरदार यांच्या समाज-परिवर्तनपर विचारदर्शन घडवणाऱ्या लेखांचे संकलन म्हणजे हा ग्रंथ होय. प्रस्तुत ग्रंथांतून गं.बा.सरदारांची एक नवी ओळख ते वाचकांना करून देऊ पाहतात. सरदारांचे व्यक्तिमत्त्व जाणून घेण्यासाठी आधी त्यांचे विचार समजून घेणे आवश्यक असल्याचे ते सांगतात. "माणूस जेव्हा दुसऱ्या माणसाचा अमानुष छळ करतो, तेव्हा ज्याचा छळ होतो त्याची तर हानी होतेच, पण छळ करणाऱ्या माणसाचाही अध:पात होत असतो. म्हणून मनुष्यत्वाची विटंबना, मग ती कुठेही व कुणाच्याही बाबतीत होवो, माणुसकीची चाड असलेल्या प्रत्येकाला तिची चीड आली पाहिजे." सरदारांच्या या अवतरणातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची पुरेशी ओळख होते. गं.बा.सरदार साहित्य, धर्म, राजकारण, अर्थकारण, समाजकारण या सर्वच क्षेत्रात वावरणारे मोठे विचारवंत होते. त्यांनी या सर्व क्षेत्रांकडे अतिशय व्यापक दृष्टीने पाहिले आहे. माणसावर लादलेली गुलामगिरी आणि समाजातील विषमता याबद्दल त्यांना कमालीचा खेद होता. माणसाच्या विकासाला आणि उन्नतीला बळ पुरवणाऱ्या गोष्टींचा पुरस्कार करणारे ते विचारवंत होते. त्यादृष्टीने त्यांनी साहित्यविश्वात पेरलेले विचार वेचण्याचे कार्य नसिराबादकरांनी केले आहे.

'साहित्यातील सामाजिकता' हा सरदारांचा महत्त्वाचा लेख या संपादनात समाविष्ट केला आहे. साहित्य, संस्कृती आणि विज्ञानोपासना आणि दलित साहित्यावरील दोन महत्त्वाचे आणि विचारप्रवृत्त करणारे लेख साहित्यावरील चर्चेच्या पहिल्या विभागात समाविष्ट आहेत. साहित्यव्यवहार निकोप आणि वृद्धिंगत व्हावा याबाबत त्यांनी केलेले चिंतन मौलिक स्वरूपाचे आहे. साहित्याची समाजसापेक्षता अधोरेखित करताना ते साहित्याचा मूलाधार समाज असल्याचे वाचकाच्या मनावर बिंबवतात. समाजाला केंद्रवर्ती ठेवून साहित्यकृतीचे आकलन करून घेताना समाजाच्या विविध समस्यांबद्दलचे गंभीर भान असणे महत्त्वाचे असल्याचे मत आपल्या चिंतनातून व्यक्त करतात. सरदारांच्या वाङ्मयीन भूमिकेची इत्थंभूत ओळख निर्माण करणारे त्यांचे लेख या संपादनात एकत्र केले आहेत. सरदार मार्क्सवादी विचारांची परिदृष्टी स्वीकारलेले विचारवंत होते. त्यामुळे मार्क्सवादी विचारांच्या प्रभावातून जाणारे त्यांचे चिंतनही या लेखांमधून पाहता येते. लेखकाचे स्वातंत्र्य आणि बांधिलकी यासंदर्भातील सरदारांची भूमिका स्वागतार्ह आहे. ते साहित्यातील एकारलेपण आणि साचलेपणाचा वेध घेणारे विमर्शक आहेत. त्यांनीच मराठी

साहित्यात सामाजिकदृष्टीने वाङ्मयेतिहासलेखनाकडे पाहण्याची दृष्टी दिली. कारण नसिराबादकर म्हणतात तसे, "वाङ्मयेतिहास हा केवळ वाङ्मयीन प्रेरणा, प्रवृत्ती आणि कलाकृती यांचा परामर्श नसून, समाजाच्या अनेकविध प्रयत्नांच्या व नवनिर्मितीच्या इतिहासाचे ते एक अंग आहे." (प्रस्तावना/पृष्ठ १८) अशी सरदारांची वाङ्मयेतिहासाकडे पाहण्याची धारणा होती. दलित साहित्याच्या रूपाने मराठी वाङ्मयात झिरपलेला नवा झरा सरदारांना महत्त्वाचा वाटतो. माणसाच्या नैसर्गिक हक्कांना पायबंद घालणाऱ्या प्रवृत्तीविषयी त्यांना मनस्वी चीड होती. या संपादनामध्ये समाविष्ट 'दलित साहित्य: प्रेरणा, स्वरूप व दिशा' आणि 'दलित साहित्य अभिव्यक्तीच्या नव्या वाटा शोधणार का?' हे दोन लेख या दृष्टीने अभ्यसनीय आणि महत्त्वाचे आहेत. दलित साहित्याच्या संदर्भात सरदारांनी केलेले चिंतन फार मौलिक आणि दिशादर्शकही ठरले आहे.

सरदारांचे काही वैचारिक लेखही या संपादित ग्रंथात एकत्र केले आहेत. शिवाय महात्मा फुले, राजर्षी शाहू छत्रपती, कर्मवीर भाऊराव पाटील, महात्मा गांधी आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारख्या समाजसुधारकांविषयीचे लेख आहेत. त्यांनी चर्चेला घेतलेले विचारवंत, समाजसुधारक हे स्वातंत्र्याच्या धामधुमीत समाजसुधारणेकडे आणि समाजाच्या नानाविध प्रश्नांकडे जगाचे लक्ष वेधणारे होते. सरदार सामाजिक सुधारणांना अग्रक्रम देणारे विचारवंत आहेत. त्यादृष्टीने येथे एकत्र केलेले लेख वाचनीय आणि विचारप्रवृत्त करणारे आहेत. तर शेवटच्या गटात समाजपरिवर्तनपर चिंतन असलेले 'भारतीय संस्कृती आणि समाजपरिवर्तन', 'राष्ट्रीय एकात्मता आणि सामाजिक न्याय', 'परिवर्तनवादी शक्तींची एकजूट' आणि 'वृत्तपत्रे आणि लोकशाही' हे चार लेख आजही फार महत्त्वाचे आहेत. कारण हे लेख विज्ञाननिष्ठेचा पुरस्कार करण्याबरोबर समाजातील अंधानुकरणाने चाललेल्या गोष्टींचा बुरखा फाडणारे आहेत. यातील पहिल्या लेखात सरदार भारतीय संस्कृती आणि समाजपरिवर्तन यामधील अनुबंध स्पष्ट करू पाहतात. भारत हा बहुभाषिक आणि बहुसांस्कृतिक जीवन जगणारा देश आहे. अशा देशातील सर्व समूहांना एकत्र गुंफणाऱ्या गोष्टींची चर्चा, हे या लेखाचे बलस्थान आहे. तर परिवर्तनशील शक्ती एकत्र आल्याशिवाय खऱ्या परिवर्तनाला योग्य दिशा आणि गती येणार नाही, असे सरदारांचे म्हणणे आहे. त्यांनी या लेखाच्या माध्यमातून परस्परांपासून दूर गेलेल्या अनेक परिवर्तनवादी चळवळींना मार्गदर्शन केले आहे. गं.बा.सरदार आजच्या सामाजिक जीवनाची चिकित्सा करताना समाजातील नानाविध प्रश्नांची चर्चा करतात. त्यामुळे समाजातील प्रश्नांकडे गांभीर्याने पाहण्याचा दृष्टिकोन तयार होऊन सामाजिक भान प्राप्त होते. एकूणच हे संपादन सरदारांच्या विचारविश्वाचे दर्शन घडवण्यात यशस्वी झाले आहे.

७

महात्मा फुले हे आधुनिक महाराष्ट्राच्या उभारणीतील महत्त्वाचे समाजसुधारक आहेत. सामाजिक परिवर्तनहेच एकमेव त्यांच्या जीवनाचे उद्दिष्ट होते. त्यातून त्यांनी मानवी हक्क आणि सामाजिक न्याय, समतेसाठी लढाउभारला. त्यांनी खऱ्या अर्थाने बहुजन समाजाला जागृत केले. त्यांच्या घरापर्यंत शिक्षणाची गंगा नेली. शिक्षितांची नवी पिढी

घडवण्यात त्यांनी महत्त्वपूर्ण भूमिका बजावली. सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, धार्मिक, राजकीय, शेती, आरोग्य अशा सर्वच क्षेत्रात त्यांनी क्रांतिकारी कार्य उभारले. त्यांनी स्थापन केलेल्या सत्यशोधक समाजाचे अनुयायी गावोगावी निर्माण झाले. त्यांनी पेरलेले अक्षरधन महाराष्ट्रात सर्वदूर उगवून येऊ लागले. त्यांच्या विचारातून महाराष्ट्रात नवी पिढी प्रबोधन आणि सामाजिक सुधारणेच्या क्षेत्रात पुढे आली. महाराष्ट्रात सर्वदूर, खेडोपाडी काम करू लागली. समाजपरिवर्तनाचे माध्यम म्हणून जोतीराव फुले यांनी पुष्कळ लेखन केले. त्यांची साहित्यनिर्मिती नवमहाराष्ट्राच्या उभारणीत महत्त्वाची भूमिका घेणारी होती. कविता, निबंध, नाटक असे विविध लेखनप्रकार हाताळून त्यांनी आपले विचार लोकांपर्यंत पोहोचवले. त्यांच्या साहित्यनिर्मितीमुळे पुढे सत्यशोधकीय साहित्याची मोठी परंपरा निर्माण झाली. त्यामुळे 'प्रबोधनाचा पूर्वरंग' म्हणून त्यांच्या साहित्याचे स्थान अनन्यसाधारण आहे. ल.रा.नसिराबादकर यांनी याच विचाराने त्यांच्या लेखनातील निवडक निबंधांचे संपादन केले आहे. 'प्रबोधनाचा पूर्वरंग'ला लिहिलेल्या दीर्घ प्रस्तावनेत नसिराबादकर आपली भूमिका मांडताना लिहितात, "जोतीरावांच्या विचारप्रणालीने आजवर उपेक्षित राहिलेल्या लक्षावधी मानवी समूहांच्या जीवनात पहाट झाली. वाङ्मयनिर्मितीच्या जाणिवा आणि अनुभवांच्या कक्षा रुंदावल्या. नव्या जीवनाशयाचे क्षितिज त्याला लाभले. महाराष्ट्राच्या समाजजीवनाप्रमाणेच आधुनिक वाङ्मयनिर्मितीचाही हा पूर्वरंग होता." (प्रस्तावना/पृष्ठ छत्तीस)

म्हणूनच नसिराबादकरांनी प्रस्तुत संपादनासाठी निवडलेले निबंध महात्मा फुलेंचे आजच्या समाज उभारणीतील योगदान अधोरेखित करणारे आहेत. महात्मा फुले यांनी मराठी ग्रंथकार सभेस लिहिलेल्या पत्राला नसिराबादकर 'नव्या वाङ्मयीन परंपरेचा जाहीरनामा' म्हणतात, ते अतिशय समर्पक आहे. महात्मा फुले यांनी हे पत्र लिहून उपेक्षित समाजाच्या दुःखाला वाचा फोडली. जाणीवपूर्वक वंचित ठेवलेल्या समाजाला आणि त्यांनी निर्माण केलेल्या साहित्याला स्वतःच्या स्वतंत्र भूमीवर वाढण्यासाठीचे हे पत्र प्रेरणास्रोत ठरले. शहरी आणि पांढरपेशांचे साहित्य हेच केवळ साहित्य मानले जाणाऱ्या समाजाच्या डोळ्यात अंजन घालणारे हे पत्र खरोखरच नव्या युगाची नांदी देणारे ठरले. महात्मा फुले वास्तववादी लेखनाची सुरूवात करणारे लेखक होते. अशा पद्धतीने पुढे साहित्यासह सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रात घडलेल्या क्रांतिकारी गोष्टींची प्रेरणा म्हणून अधोरेखित करता येणारे सारे निबंध या संपादनात एकत्रित करण्यात आले आहेत. त्यामध्ये खेड्यापाड्यांत त्यांचा काय जुलूम असेल बरे!, इंग्रजांचे राज्य आहे तोच शूद्रांनी दास्यातून मुक्त व्हावे, शूद्रातिशूद्रांच्या मुलांनी विद्या शिकू नये म्हणून कट, शेतकऱ्यांच्या सुधारणा करण्याविषयी उपाय, सार्वजनिक सत्य धर्म, सत्यशोधक समाजोक्त विवाहसंबंध विधी, ब्राह्मणांचे कसब हे फुले यांचे गाजलेले क्रांतिकारी निबंध येथे एकत्रित केले आहेत. या निबंधांचे महाराष्ट्राच्या प्रबोधनातील योगदान अधोरेखित करणारी विस्तृत प्रस्तावना नसिराबादकरांनी या ग्रंथाला लिहिली आहे. महात्मा फुलेंनी तत्कालीन वास्तवाचे मीमांसेसह कसे विश्लेषण आणि चित्रण केले आहे, त्याची सविस्तर चर्चा या प्रस्तावनेत





अनुक्रमणिका

केली आहे. शिवाय शोषणाविरुद्धचा एक आवाज म्हणून त्यांचे लेखन समाजाला कसे जाग आणत होते याचे विवेचन उदाहणांसह विस्ताराने नसिराबादकरांनी केले आहे. हे सारे लेखन म्हणजे, फुले यांनी शूद्रातिशूद्रांना जागे करण्याचा केलेला यज्ञ आहे, असेच म्हणावे लागेल.

८

लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख हे एकोणिसाव्या शतकातील महत्त्वाचे समाजसुधारक होते. त्यांनी महाराष्ट्राला आधुनिक जीवनदृष्टी दिली. देशामध्ये आधुनिक जीवनदृष्टी लाभलेल्या लोकांमध्ये लोकहितवादींचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल. पुरोगामी महाराष्ट्राच्या उभारणीत त्यांचे योगदान मोठे आहे. पाश्चात्त्य देशात निर्माण झालेल्या ज्ञानभांडाराचे त्यांनी नेहमीच स्वागत केले. त्यातूनच समाज बुद्धिवादी व्हावा अशी अपेक्षा ठेवून त्यांनी लेखन केले. पारंपरिक आणि गतार्थ विचारधारेच्या समाजाला जागे करण्यासाठी त्यांनी आपली लेखणी झिजवली. अशा एका महत्त्वाच्या लेखकाचे विचारप्रवृत्त करणारे लेख डॉ. निर्मलकुमार फडकुले यांच्या सोबतीने संपादित करून ल.रा.नसिराबादकर यांनी 'निवडक लोकहितवादी' हा महत्त्वाचा ग्रंथ सिद्ध केला. नव्या पिढीने आधुनिक विचारांची कास धरावी या हेतूनेच या ग्रंथात लोकहितवादींच्या शतपत्रांमधील निवडक लेख समाविष्ट केले आहेत. या संपादकद्वयीने प्रस्तावनेत व्यक्त केलेली अपेक्षा आजच्या स्थितीत फार मौलिक आहे. ते लिहितात, "लोकहितवादी हे नाव महाराष्ट्रातल्या समाजपरिवर्तनाच्या विचारांशी आणि चळवळीशी कायमचे निगडित झाले आहे. त्यांच्या विचारधनाचा समृद्ध वारसा आजच्या अभ्यासकांनी केवळ जपला पहिजे असे नव्हे, तर त्याचा सांगोपांग अभ्यास करून आजच्या परिस्थितीतही तो कसा प्रेरक व मार्गदर्शक ठरतो ते पाहिले पाहिजे." (प्रस्तावना/पृष्ठ एक) ही या संपादकांनी नव्या पिढीकडून ठेवलेली अपेक्षा फार मौलिक आहे. आज सामाजिक, राजकीय क्षेत्रात सुरू असलेली पडझड पाहता, ही अपेक्षा फारच अर्थपूर्ण वाटते.

लोकहितवादी यांच्या 'हिंदु लोकांचा आळशी स्वभाव' या लेखापासून या ग्रंथाची सुरूवात होते. लोकहितवादींनी संबंध देशातील जनतेला उद्देशून वापरलेला 'हिंदु' हा शब्द आणि त्यांची 'आळशी' ही प्रवृत्ती देशहितासाठी बाधक आहे. त्यासाठी अशा पद्धतीचे लेख शतपत्रामध्ये लिहून लोकहितवादी लोकांच्या डोळ्यात अंजन घालत होते. इंग्रजी विद्या, संस्कृत विद्या हे लेख आपली ज्ञानपरंपरा आणि पाश्चिमात्य देशातील ज्ञानवृद्धी या अंगाने विचार करणारे आहेत. विद्वान कोणास म्हणावे, निरूद्योगीपणाच्या चाली, निर्भयपणाविषयी, स्त्रियांची स्थिती हे लेख आपल्या प्रवृत्तींवर बोट ठेवणारे आहेत. तर हिंदुस्थान देशास दारिद्र्य येण्याची कारणें, हिंदुस्थानच्या पराधीनतेची कारणे, हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास का नाही? यासारखे लेख अंतर्मुख होऊन चिंतनप्रवृत्त करणारे आहेत. वास्तविक या संपादनातील प्रत्येक लेख फार विचारपूर्वक निवडला आहे. हे लेख वाचत असता संपादकांची यामागील भूमिका लक्षात येते. हे संपादन अतिशय जाणीवपूर्वक आणि एका उदात्त हेतूने केलेले आहे. यातून लोकहितवादींचे थोरपण अधोरेखित होतेच. परंतु,

लोकहितवादींच्या आपल्याकडून असलेल्या अपेक्षाही तेवढ्याच ठाशीवपणे मनावर बिंबवल्या जातात. अशा पद्धतीची संपादने ही अल्पकाली समाजबुद्धीला नेहमी दिशा आणि चेतना देणारी ठरतात. समाजाला योग्यवळणावर आणण्याबरोबर नवा विचार करायला भाग पाडतात.

९

ल.रा.नसिराबादकर यांचा 'भाषिक कौशल्यांचा अभ्यास' हा एक आस्थाविषय होता. त्यासाठी त्यांनी आयुष्यभर सर्जकतेने काम केले. ते स्वतः भाषा खूप खुबीने आणि कौशल्यपूर्वक वापरायचे. त्यांच्या या वैविध्यपूर्ण भाषावापराचा प्रत्यय त्यांच्या व्याख्यानांबरोबर लेखनातूनही येतो. त्यांनी केलेले ग्रंथलेखन आणि लिहिलेल्या दीर्घप्रस्तावना यादृष्टीने अभ्यासता येतील. विद्यार्थ्यांमध्ये भाषिक कौशल्यांचा विकास व्हावा यासाठी ते सतत प्रयत्नशील असत. 'व्यावहारिक मराठी' हे पुस्तक त्यांनी विद्यार्थ्यांना डोळ्यासमोर ठेवूनच लिहिले. आज सर्व महाराष्ट्रात हे महत्त्वपूर्ण पुस्तक लोकप्रिय आहे. या पुस्तकामध्ये त्यांनी 'बोलावे आणि लिहावे कसे?' याचा विस्ताराने विचार नोंदवला आहे. भाषा म्हणजे काय, भाषेत शब्द कसे काम करतात, भाषिक कौशल्ये आत्मसात करण्यासाठी समृद्ध शब्दसंग्रह कसा आवश्यक असतो, याची मूलगामी चर्चा केली आहे. भाषिक कौशल्ये आत्मसात करण्यात भाषेचे संपादन ही सर्वात प्राथमिक आणि महत्त्वाची पायरी आहे. शब्दसंग्रह अभ्यास, त्या भाषेतील साहित्याची ओळख, चांगल्या रचनांचे वाचन हे भाषा समृद्धतेसाठी आवश्यक असते. त्यादृष्टीने विवेचन करीत भाषावापरात उच्चारण, आघात, देहबोली या गोष्टींचे महत्त्व त्यांनी विशद केले आहे. भाषण कला संपादन करताना वक्ता होऊ इच्छिणाऱ्याने भाषा सर्जकपणे वापरण्यासाठी वरील भाषिक कौशल्यांबरोबर शब्दांचे उच्चार, आघात आणि देहबोली यांचा बारकाईने विचार केला पाहिजे, असे नसिराबादकर सांगतात. लिहिताना शब्दांची निवड, वाक्यरचना, परिच्छेद अशा बाबींच्या विचारासह लेखनाच्या आकृतिबंधांची चर्चा केली आहे. सर्जनशील लेखनात कल्पना आणि तिचा विस्तार महत्त्वाचा असतो. त्यादृष्टीने कल्पाविस्तार, सारांशलेखनाचा विचार त्यांनी केला आहे.

कार्यालयीन कामकाजात भाषा नेहमी सैलसर वापरली जाते. भाषावापराचे सामान्य संकेतही पाळले जात नाहीत. त्यासाठी कार्यालयीन लेखनव्यवहाराचा नसिराबादकरांनी विस्ताराने आढावा घेतला आहे. आपली कार्यालयीन कार्यसंस्कृती विकसित करणे, हा त्यांचा प्रधान हेतू यामागे आहे. त्यासाठी ते टिप्पणीलेखनापासून, इतिवृत्त, अहवाल, निवेदने कशी लिहावीत याविषयक चर्चा करणारी अनेक उदाहरणे घेतली आहेत. पत्रव्यवहार, कार्यालयीन व्यवहाराचा महत्त्वाचा भाषिक भाग आहे. त्यादृष्टीने सर्व प्रकारच्या पत्रलेखनाची चर्चा, पत्रात्मक लेखनाची नवी रूपे म्हणून निमंत्रण आणि कार्यक्रम-पत्रिकांचाही विचार केला आहे. प्रसारमाध्यमांचा वाढता पसारा लक्षात घेऊन या माध्यमांसाठी आवश्यक असणाऱ्या लेखनकौशल्याचा अभ्यास विद्यार्थ्यांसाठी करून दिला आहे. बातम्यांचे नमुने, वृत्तलेखन, विविधप्रकारच्या लेखनाचे आकृतीबंध याची चर्चा त्यांनी

या पुस्तकात विस्ताराने केली आहे. वर्तमानपत्रातील लेखनासह आकाशवाणी, दूरचित्रवाणी अशा सर्वच माध्यमांना डोळ्यांसमोर ठेवून ही चर्चा केलेली दिसते. शिवाय काळाची गरज ओळखून आणि जागतिकरणानंतरच्या बदलत्या समाजव्यवस्थेचा, जीवनशैलींचा आणि व्यावसायिक दृष्टिकोनाचा विचार करून नसिराबादकरांनी भाषांतर, जाहिरातलेखन, संपादन, मुलाखत आणि मुद्रितशोधन या रोजगाराच्या मोठ्या संधी मिळवून देणाऱ्या क्षेत्रांची ओळख करून दिली आहे. या क्षेत्रांच्या ओळखीसह या क्षेत्रांमध्ये कोणत्या भाषेची गरज असते, तेथील भाषिक कौशल्ये आत्मसात करण्यासाठी काय करायचे याचा धडाच या लेखनातून दिला आहे. त्यांचे हे पुस्तक महाराष्ट्र आणि महाराष्ट्राबाहेरील जवळजवळ सर्वच विद्यापीठांमध्ये संदर्भ म्हणून वापरले जाते.

ल.रा. नसिराबादकर यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन!

---

**आवाहन : मराठीतील संज्ञांचा आग्रहपूर्वक वापर करून परिभाषा समृद्ध करा**

मराठी भाषेतून व्यक्त करण्यासाठी अधिक अर्थवाही, चपखल, उच्चारसुलभ शब्द वा संज्ञा उपलब्ध असल्या तरी त्यांच्याकडे कळत-नकळत दुर्लक्ष होऊन सतत इंग्लिशमधले शब्द/संज्ञा वापरल्या जातात व त्याच रूढ होतात व पुढे शास्त्राद्रुढीर्बलीयसि ह्या न्यायाने आपल्या भाषेतील उत्तमोत्तम, सुयोग्य संज्ञा नष्टच होऊन जातात. काही वेळा विज्ञान-तंत्रज्ञानविषयक संकल्पनांसाठी अनेक लोक उत्तमोत्तम नवीन पारिभाषिक संज्ञाही सुचवतात. त्यांचा स्वीकार करून त्या रूढ करणेही गरजेचे असते. अन्यथा परभाषेतील संकल्पनाच लिप्यंतरित रूपात वापरण्यावर भर दिला जाऊन पारिभाषिक संज्ञानिर्मितीची महत्त्वाची प्रक्रिया बंदच पडते. असे होणे भाषेच्या व एकंदर समाजाच्या दृष्टीने योग्य नाही. त्यामुळे वाचकांच्या वाचनात आलेल्या, स्मृतींत रेंगाळलेल्या किंवा स्वत:ला सुचलेल्या कोणत्याही विषयातील पारिभाषिक संज्ञा ९८२२० ३१९६३ वा ९६७३७ ८५०८५ ह्या क्रमांकावर किंवा bhasha.ani.jeevan.map@gmail.com ह्या ई-पत्त्यावर कळवत राहावे. पारिभाषिक संज्ञा पाठवताना शक्यतो त्या कुठल्या विषयाशी संबंधित आहेत ते नमूद करावे. नमुन्यादाखल काही विज्ञानविषयक संज्ञा पुढीलप्रमाणे -

**Antivirus** अँटिव्हायरस (विज्ञान)-विषाणुरोधक

**Contact lens** कॉंटॅक्ट लेन्स (विज्ञान)-नेत्रस्पर्शी भिंग

**Recycling** रिसायकलिंग (विज्ञान)-पुनर्चक्रीकरण, पुनर्वापर

**Reaction** रिॲक्शन (विज्ञान)-अभिक्रिया

**Polymer** पॉलिमर (विज्ञान) - बहुवारिक

**Filler** फिलर (विज्ञान) - भरणद्रव्य

**Virus** व्हायरस (विज्ञान) - विषाणू

**Degradation** डिग्रेडेशन (विज्ञान) - विघटन

**संपर्क :** ९८२२० ३१९६३; ९६७३७ ८५०८५ ;
**bhasha.ani.jeevan.map@gmail.com**





अनुक्रमणिका

**ई-शब्दचर्चा / शब्द-शोध**

## दुर्मिळ का दुर्मीळ?

**विजय पाध्ये (उपाध्यक्ष, मराठी अभ्यास परिषद)-** दुः + मिळ = दुः हा उपसर्ग आणि मिळ हा धातू मिळून हा मूळ शब्द तयार झाला आहे. विसर्गामागे अ किंवा आ सोडून कोणताही स्वर आणि पुढे कोणताही स्वर किंवा मृदू व्यंजन येत असेल तर विसर्गाचा र् होतो.

दुः मध्ये विसर्गामागे उ आहे तर पुढे मिळ मधील (म् + इ ) म आहे. म हा अनुनासिक व्यंजन तर आहेच पण तो मृदू व्यंजनसुद्धा आहे. म्हणून विसर्गाचा र् झाला आणि तो र् रफारच्या रुपात मि वर दिल्या गेला. येथे मि ची वेलांटी बदलण्याचा प्रश्नच नाही म्हणून ज्या ठिकाणी दुर्मीळ ⊠ असे दीर्घ लेखन केले ते चूक आहे किंवा मुद्रणदोष आहे.

= द् + उ + ◌ः + म् + इ + ळ् + अ = दुः + मिळ

= द् + उ + र् + म् + इ + ळ् + अ = दुर् + मिळ

= **दुर्मिळ √√**

म्हणून दुर्मिळ हे लेखन योग्य आहे, बरोबर आहे. गोंधळ करुन घेऊन नये.

तुम्हांला काय वाटतं?

**स्व.अरुण फडके (संपादक, मराठी लेखनकोश) :** दुर्+मिल् अशी ही मुळात संस्कृत पदे आहेत. 'र्'पुढे 'म' हे मृदू व्यंजन आल्यामुळे 'र्' रफाराच्या रूपात येतो आणि दुर्मिल असा 'उपलब्ध होण्यास कठीण' अशा अर्थाचा संस्कृत शब्द तयार होतो. इथे 'मि' ऱ्हस्व बरोबरच आहे. परंतु हा शब्द मराठीत घेताना अंत्य 'ल'चा 'ळ' केला जातो, त्यामुळे तो तद्भव शब्द ठरतो. 'कोकिल, तिल, बिल' आणि 'कुल, बकुल, गुग्गुल, मंजुल' हे संस्कृत शब्दही ह्यांमधल्या अंत्य 'ल'चा 'ळ' करून तद्भव म्हणून मराठीत घेताना अ-कारान्तापूर्वीचा इकार-उकार दीर्घ असतो ह्या मराठी नियमानुसार आपण कोकीळ, तीळ, बीळ आणि कूळ, बकूळ, गुग्गूळ, मंजूळ असे लिहितो. ह्या शब्दांप्रमाणेच दुर्मीळ हेच मराठी तद्भव रूप योग्य ठरते.

**माधव देशपांडे (सुप्रतिष्ठित प्राध्यापक, संस्कृत आणि भाषाविज्ञान विभाग, मिशिगन विद्यापीठ, संयुक्त संस्थाने, अमेरिका) :** मी जेव्हा शाळेत होतो, तेव्हा मराठी शब्द त्यांच्या संस्कृत व्युत्पत्तीला धरून लिहिण्याची पद्धत होती. माझ्या समजुतीप्रमाणे नंतर जे शुद्धलेखनाच्या नियमात फरक करण्यात आले ते उच्चारानुसारी आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे 'दुर्मीळ' सारख्या शब्दांत जरी शेवटचा 'ळ' अकारान्त लिहिण्याची मराठीत पद्धत असली तरी उच्चारात तो शेवटचा अकार निघून जातो व तो शब्द व्यंजनान्त होतो. पूर्वीचा स्वर उच्चारात दीर्घ होण्याचे ते एक ऐतिहासिक कारण आहे.

## कवितेच्या निमित्ताने!

**गजानन गुर्जरपाध्ये**

संस्कृतच्या पदवीधराला मराठी शिकवायला जमेल या समजुतीमुळे मला शाळेत मराठी विषय देण्यात आला. पंडिती-काव्य शिकवताना संस्कृत उपयोगी पडते. मराठीतले बरेचसे शब्द संस्कृतमधून आलेले आहेत, हे खरे असले तरी वरच्या वर्गांना मराठी शिकवताना मला अवघडल्यासारखे वाटत असे. बरोबरच्या अनुभवी आणि नामवंत शिक्षकांनी मला वेळोवेळी मार्गदर्शन केले नसते, तर माझी फजिती झाली असती आणि मुख्य म्हणजे मला ते कंटाळवाणे वाटले असते. सगळे आता लक्षात नाही पण काही ठळक गोष्टी सांगतो.

अमुक कवी शब्द बरोबर योजतो हे जाणवले, तरी मुलांना पटवायचे कसे? हा साधा वाटणारा प्रश्न आहे. आपण लिहायला बसलो की त्याच अर्थाचे अनेक शब्द आठवतात. त्यापैकी एक आपण पसंत करतो, ते का? असा विचार मी केला आणि मुलांनाही करायला सांगितलं. अलीकडे आणि पलीकडे हे शब्द वाईट नाहीत. पण पलीकडे कावळा ओरडतोय हेच ज्ञानेश्वरांनी 'पैल तो गे काऊ कोकताहे' या ओळीत सांगितले आहे. ते आपल्याला गोड वाटते. किंवा वसंत बापट यांच्या 'दक्खन राणी'मधल्या, "ऐल ते पैल शंभर मैल, एकच बोगदा मुंबई-पुण्यात" यात मैलच्या बरोबर ऐल, पैल जुळतात. कधीकधी अगोदर गद्यवर्णन सांगून मग कवितेतल्या ओळी सांगितल्या तर मुलांना हा मुद्दा अधिक कळत असे. एका काठावर हिरवे गवत. पलीकडच्या दुसऱ्या काठावरही तसेच हिरवे गवत आणि मधून पाणी वाहत आहे, हे पहा आणि "ऐलतटावर पैलतटावर, हिरवाळी घेऊन, निळासांवळा झरा वाहतो बेटाबेटातून" हे पहा. गंगाधर गाडगीळांच्या लेखात 'घेऊन' या शब्दाने झरा आणि हिरवळ यात नाते असल्याचे मी वाचले आणि माझ्या तंत्राने मी दोन चित्रे निर्माण करून म्हटले, "एक माणूस रस्त्याने चालला आहे. त्याचा डाव्या उजव्या बाजूला लोक आहेत हे एक चित्र. संध्याकाळी एक माणूस आपल्या दोन मुलांना घेऊन फिरायला चालला आहे, हे चित्र पहा!" खूप नंतर नरहर कुरुंदकर यांनी मराठी शिक्षकांसमोर बोलताना हा मुद्दा नेमक्या शब्दात मांडला. शब्द केवळ वस्तू किंवा व्यक्ती दाखवत नाही तर बोलणाऱ्याच्या भावना दर्शवतात. 'आपला तो बाब्या आणि दुसऱ्याचा तो कारटा' या म्हणीत हे आलेलेच आहे. पण आधी ते लक्षात आले नव्हते. मराठी विषय घेऊन पदवी घेतलेल्या शिक्षकाच्या दृष्टीने हे साधेच आहे. मला ते कष्टाने आणि हळूहळू समजत गेले.

रुपारेल कॉलेजमध्ये प्रा॰ल॰ग॰जोग आम्हाला शिकवत होते. त्यांची उदाहरणे मार्मिक असत. 'जयोऽस्तुते श्रीमहन्मंगले शिवास्पदे शुभदे' या सावरकरांच्या ओळींत संस्कृत शब्द शोभून दिसतात, कारण स्तोत्र संस्कृतमध्ये असणार असा संकेत आपल्या मनात आहे. पण माधव ज्युलियन यांच्या कवितेत आलेले, 'वन्दे त्वमेकं अल्लाहू

अकबर' हास्यास्पद ठरले, हे त्यांनी दिलेले उदाहरण आठवते. जोग सरांनी असेच एकदा दिलेले एक गंमतीदार उदाहण आठवते. भा॰रा॰तांबे यांच्या कवितेत आई आपल्या मुलीचे वर्णन 'मैद्यापरि विसविशीत सगळे' असे करते हे सांगून ते म्हणत, "मैदा हा स्वयंपाकघरातील एक पदार्थविशेष आहे आणि विसविशीत हा त्यावेळच्या बायकांच्या तोंडचा शब्द इथे अगदी योग्य वाटतो.

माणूस जे जे करतो त्यात त्याचे अंतरंग प्रगट होत असते, हे समजावून सांगताना, मी सावरकर सशस्त्र क्रांतिकारक असल्याने त्यांच्या कवितेत स्वतंत्रता देवीला उद्देशून, 'अधमरक्तरंजिते' असे संबोधन आले आहे, हे सांगत असे. लेखनात लेखकाचे प्रतिबिंब कळत-नकळत पडत असते, हे मुलांना यावरून सहज लक्षात येई. शंकर वैद्य, 'निषाद' नावाच्या मासिकात कवितेविषयी नियमित सदर लिहीत असत. त्यात त्यांनी बालकवी यांचे लक्ष लहान मुलासारखे भिरभिरते आहे हे 'श्रावणमासी हर्ष मानसी'या कवितेचे विवेचन करताना छान मांडले होते, क्षणात बालकवी पृथ्वी-वरचे वर्णन करतात तर दुसऱ्याच ओळीत आकाशाकडे त्यांचे लक्ष गेलेले दिसते. या केवळ योगायोगाने वाचनात आलेल्या या लेखांनी मला दिशा दाखवली.

कविता ही एक एकसंध कृती असते. तिच्यात ऑरगॅनिक युनिटी असते, हे माझ्या खूप उशिरा लक्षात आले. बा॰भ॰बोरकर यांची महात्मा गांधीजींच्या संध्याकाळच्या प्रार्थनासभेचे वर्णन करणारी 'सायंप्रार्थना' नावाची कविता शिकवत असताना मला ती एकदम जाणवली. व्यास-वाल्मीकींसारखे वैदिक काळातले ऋषी संध्याकाळी अस्ताला जाणाऱ्या सूर्याला अर्घ्य देत आहेत, असे चित्र कवीच्या मनात पार्श्वभूमीसारखे असावे. कवितेतील पहिल्याच ओळीतला सांध्यवंदना शब्द सूचक आहे. "आताच संपली सांध्यवंदना त्याची, जो नवयुगजनिता करुणामूर्ती दधीचीची" दधीचीने आपली हाडे दिली, इंद्राने त्यापासून वज्र बनवले आणि राक्षसांना मारले. संस्कृत शिकलेल्या माझ्या मनात त्वगस्थिमात्र (केवळ त्वचा आणि हाडे शिल्लक राहिलेला), तप:कृश वगैरे शब्द येणे साहजिक होते. इतिहासात वाचलेला 'गांधीयुग' शब्द आठवून नवयुगजनिता हे विशेषण सार्थ वाटते. नदीत किंवा समुद्रात ऋषी अर्घ्य देतात, त्यामुळे लाटा, अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे त्यावर पडणारे किरण हे चित्रात येणे ओघाने आलेच, त्यामुळे पुढच्या ओळी येतात. "जनलाटा हटल्या नटल्या तत्तेजाने,

जणू कांचनरवीच्या स्पर्शे सागरवीची"

कवीला ऋषितुल्य गांधीं-बद्दल आदरच नव्हे, तर पूज्यभाव असल्याने, सगळे निघून गेले तरी पण तो तिथेच थांबतो. "जन सर्व पांगला, खिळलो मी परी धरणी, पदमुद्रा प्रभूच्या चुंबित अंतःकरणी" या ओळी आपोआप आल्यासारख्या वाटतात, हे वेगळे सांगायला नको.

नवीन युग निर्माण करण्याची आणि त्यावर आपली मुद्रा टंकित करण्याची

किमया त्यांनी केली. चालताना मागे पावलांचे ठसे उमटतात. चालणाऱ्याला त्याची जाणीव असेल किंवा नसेल. राजा आपली मुद्रा निर्माण करतो, त्यापेक्षा हे वेगळे आहे. पदमुद्रा या शब्दात हीच गम्मत आहे. मुद्रेचे सामर्थ्य, सत्ता आहे पण ज्याची ती मुद्रा आहे त्याला त्याचे काहीच नाही. कवितेच्या एकात्मतेची जाणीव मला झाली. शिकवताना सोय म्हणून कडवी, ओळी यात विभागलेली दिसली तरी ती एकसंध असते, म्हणून शिकवताना संपूर्ण कविता आधी वाचावी, असे सांगतात.

---

ई-शब्दचर्चा/शब्दशोध (पृ. ४५ वरून)

**स्व.अरुण फडके :** कोकीळ, तीळ, बीळ आणि कूळ, बकूळ, गुग्गूळ, मंजूळ हे सारे शब्द पूर्वीपासून असेच आहेत की. यांच्यामध्येही अंत्य अक्षर व्यंजनांतच उच्चारले जाते. किंबहुना मराठीत बहुतेक अ-कारान्त शब्दांमधले अंत्य अक्षर व्यंजनांतच उच्चारले जाते. तरीही त्यांमधला उपांत्य इकार-उकार पहिल्यापासून दीर्घच आहे. त्यामुळे दुर्मीळ असे लेखनच योग्य ठरेल.

(मराठी अभ्यास परिषदेच्या सभासदांचा आणि भाषाप्रेमींचा एक गुगल गट <e-shabda-charcha-peeth@googlegroups.com तयार केला असून त्यावर होणारी चर्चा या सदरात समाविष्ट होते. त्याचबरोबर शब्दशोध—मराठी अभ्यास परिषद असा एक व्हॉट्सअप गटही तयार केला आहे. या दोन्ही गटात सहभागी होण्यासाठी आपला ई-पत्ता एका संदेशात लिहून पाठवावा.
संपर्कासाठी क्रमांक -
विजय पाध्ये - ९८२२० ३१९६३, आनन्द काटीकर - ९४२१६ १०७०४)

---

**परिषद वार्ता**

१. सत्वशीला सामंत स्मृतिव्याख्यानाच्या निमित्ताने दि. ९ मार्च, २०१९ रोजी **मराठी कोशरचना** या विषयावर श्री. रमण चितळे यांचे विशेष व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. फर्ग्युसन महाविद्यालयाच्या ग्रंथालयात यानिमित्ताने दिवसभर मराठीतील कोशांचे एक प्रदर्शनही भरवण्यात आले होते. या कोशप्रदर्शनाला भेट देणाऱ्या व्यक्तींना महाविद्यालयातील मराठीच्या विद्यार्थ्यांनी या कोशांची माहिती दिली. यानिमित्ताने मराठीतील समृद्ध कोशपरंपरा सर्वांच्या समक्ष उभी राहिली.

२. मराठी अभ्यास परिषदेच्या वर्धापनदिना-निमित्ताने, फर्ग्युसन महाविद्यालयाच्या सहकार्याने, बुधवार, दि. १ मे, २०१९ रोजी संध्याकाळी ५.३० वाजता, महाविद्यालयाच्या सी-६ सभागृहात **शुद्धलेखनाचे तत्त्वज्ञान** या दिवाकर मोहनी यांच्या ग्रंथावर चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले. मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यवाह सुप्रिया खाडिलकर यांनी प्रास्ताविक केले. वक्त्यांची ओळख कोषाध्यक्ष वैशाली कार्लेकर यांनी करून दिली. सूत्रसंचालन सुशान्त देवळेकर यांनी केले.

श्री. दिवाकर मोहनी ह्यांनी 'शुद्धलेखनाचे तत्त्वज्ञान' ह्या ग्रंथाद्वारे व्यक्त केलेल्या भूमिके-संदर्भात अनुभवी अध्यापक व अभ्यासकांमधे जाहीर चर्चा व्हायला हवी या उद्देशाने चर्चासत्र आजोजित केले होते. त्यात मराठीच्या व्याकरणाचा विशेष अभ्यास असलेले वक्ते सहभागी झाले. प्रकृतीच्या कारणामुळे श्री. मोहनी स्वतः उपस्थित राहू शकले नाही. त्यांची भूमिका त्यांच्या कन्या व विख्यात विधिभाषातज्ञ अनुराधा मोहनी यांनी विषद केली. भाषेचे प्रमाणीकरण करण्याची आवश्यकता या पुस्तकाद्वारे आग्रहीपणे मांडली गेल्याचे त्यांनी सांगितले. तसेच व्याकरण व शुद्धलेखन ह्या भाषाव्यवहाराच्या अनुक्रमे विश्लेषणात्मक व उपयोजित अशा दोन बाजू असल्याचे त्यांनी प्रतिपादन केले. त्याशिवाय सुलभीकरणाच्या ओघात अनेक अर्थच्छटा व अर्थसातत्य यांचा लोप कसा होतो हेही सोदाहरण दाखवले. त्यानंतर श्री. सुहास लिमये यांनी आपले व्याकरणविषयक विचार मांडले व आदिवासींना प्रमाणभाषा शिकवताना येणाऱ्या समस्यांची चर्चा केली. ज्येष्ठ व्याकरण व संस्कृत भाषेचे अभ्यासक श्री. ग. उ. थिटे यांनी, मोहनींच्या काही मुद्यांशी सहमती व काही मुद्यांशी असहमती दर्शवली. मात्र त्यांनीही प्रमाणलेखनाच्या व्याकरणशुद्धतेची गरज प्रतिपादिली. श्रोत्यांपैकी प्रा. प्र. ना. परांजपे यांनी स्वरदंडविचार (स्वरदंडाच्या अनुषंगाने व्यंजनांशांची मांडणी) हा महत्त्वाचा सिद्धांत असल्याचे लक्षात आणून दिले. पद्मगंधा प्रकाशनाचे श्री. अरूण जाखडे यांनीही हे पुस्तक प्रकाशित करण्यामागची भूमिका आपल्या छोटेखानी भाषणात मांडली. प्रश्नोत्तरांनंतर भाषाव्रती पुरस्काराने सन्मानित झाल्यानिमित्त प्रा. प्र. ना. परांजपे यांचा, महाराष्ट्रशासनाचा अशोक केळकर पुरस्कार मिळाल्यानिमित्त प्रा. कल्याण काळे यांचा व मुंबई विद्यापीठाची डि.लिट्.पदवी मिळाल्यानिमित्त प्रा. अविनाश बिनिवाले यांचा सत्कार करण्यात आला. सलील वाघ यांच्या अध्यक्षीय भाषणाने कार्यक्रमाचा समारोप करण्यात आला.

(मुखपृष्ठ २-३ वर काही प्रचित्रे पाहावयास मिळतील)

**सुप्रिया खाडिलकर**

## लेखक परिचय

- **काटीकर, आनन्द** : एम॰ए॰.पीएच॰डी॰.फर्ग्युसन महाविद्यालयात मराठी विषयाचे सहयोगी प्राध्यापक, 'भाषा आणि जीवन'चे प्रमुख संपादक

  चलभाष : **९४ २१ ६१ ०७ ०४** ई-पत्ता : **anand.katikar.marathi@gmail.com**

- **खाडिलकर, सुप्रिया** : एम॰ए॰.बी॰एड॰.गरवारे वाणिज्य महाविद्यालय येथे मराठीच्या अध्यापक, मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यवाह

  चलभाष: **९८ ८१ ९० ०९ ८९** ई-पत्ता : **supriya1111973@gmail.com**

- **गंधे, शिरीष** : एम॰ए॰.बी॰एड॰.कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालय, लासलगाव येथे मराठी विषयाचे अध्यापक, १० ग्रंथ आणि अनेक लेख प्रकाशित, अनंतफंदी यांच्या वाङ्मयीन कार्यावर १०० हून अधिक भाषणे ; **पत्ता :** कलांजली, शास्त्रीनगर, लासलगाव - ४२२३०६ (नाशिक)

  चलभाष: **९७ ६६ २० २१ ४१** ई-पत्ता : **shirish.gandhe@gmail.com**

- **गुर्जरपाध्ये, गजानन** : एम॰ए॰.बी॰एड॰.संस्कृत, इंग्रजी आणि मराठी विषयाचे सेवानिवृत्त शिक्षक, सध्या राहणार कांदिवली, भाषा आणि साहित्य यांची विशेष आवड

  **चलभाष: ८७ ९६ ७५ २१ ०७**

- **चितळे, माधव** : ख्यातनाम आंतरराष्ट्रीय जलतज्ज्ञ, केंद्रीय जल आयोगाचे माजी अध्यक्ष, जलसंपदा विषयांत अनेक भारतीय आणि आंतरराष्ट्रीय महत्त्वपूर्ण जबाबदाऱ्या पार पाडल्या. या कार्याबद्दल १९९३मध्ये स्टॉकहोम वॉटर प्राईझ (पाण्याचे नोबेल पारितोषिक) ने सन्मानित. चलभाष: **९८ २३ १६ १२ ०९** ई-पत्ता : **chitalema@gmail.com**

- **तेलंग, विनीता** : सांगलीत स्वतःचा आयुर्वेदिक औषध निर्मितीचा व्यवसाय, सामाजिक कामात सक्रिय. विवेकमध्ये 'चांदण्यात फिरताना' हे कवितांविषयक सदर, काही एकांकिकांचे लेखन. विनीतावसंत या नावाने अनुदिनीलेखन.

  चलभाष : **९८ ९० ९२ ८४ ११** ई-पत्ता : **vineetatelang@gmail.com**

- **बडवे, नीती** : एम॰ए॰.पीएच॰डी॰.पुणे विद्यापीठाच्या जर्मन विभागातील सेवानिवृत्त प्राध्यापक, भाषा हा आवडीचा विषय, अमराठी लोकांना मराठी शिकवण्यासाठी पुस्तके लेखन, विविध पुस्तके -लेख प्रकाशित चलभाष: **९४ २२ ३१ ४५ १९** ई-पत्ता : **neetibadwe@gmail.com**

- **मोरे, नंदकुमार** : एम॰ए॰.पीएच॰डी॰.सहयोगी प्राध्यापक, मराठी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर : ४१६००४ चलभाष: **९४ २२ ६२ ८३ ००**

  ई-पत्ता : **nandkumarvmore@gmail.com**

- **शिंदे, विश्वनाथ** : शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथून मराठी विषयाचे प्राध्यापक म्हणून सेवानिवृत्त, सध्या सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या महात्मा फुले अध्यासनाचे प्रमुख

  **पत्ता :** बी-४०१, साई अंबियन्स, पिंपळे सौदागर, पुणे - ४११ ०२७

  चलभाष: **९८ ९० ४१ ८० २८** ई-पत्ता : **ujjwalvishw@gmail.com**

## मराठी अभ्यास परिषद : वर्धापनदिन :
## चर्चासत्र : शुद्धलेखनाचे तत्त्वज्ञान : दि १ मे, २०१९









बिकट वाट वहिवाट नसावी, धोपटमार्गा सोडु नको ।
संसारामधिं ऐस आपला, उगाच भटकत फिरु नको ॥

चल सालसपण धरुनि निखालस, खोटया बोला बोलुं नको ।
अंगिं नम्रता सदा असावी, राग कुणावर धरुं नको ।
नास्तिकपणांत शिरुनि जनांचा बोल आपणा घेउं नको ।
भलीभलाई कर कांही पण अधर्म-मार्गी शिरुं नको ।
मायबापावर रुसूं नको
दूर एकला बसूं नको
व्यवहारामधिं फसूं नको
कधी रिकामा असूं नको
परी उलाढाली भलत्यासलत्या पोटासाठी करुं नको ॥१॥

वर्म काढुनी शरमायाला उणे कुणाला बोलुं नको ।
बुडवाया दुसऱ्याचा ठेवा, करुनी हेवा, झटुं नको ।
मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्वभार हा वाहुं नको ।
एकाहुनि एक चढि जगामधिं थोरपणाला मिरवुं नको ।
हिमायतीच्या बळे गरिबगुरीबाला तूं गुरकावुं नको ।
दो दिवसांची जाईल सत्ता, अपेश माथा घेउं नको ।
बहुत कर्जबाजारी होउनी बोज आपुला दवडूं नको ।
स्नेह्यासाठी पदरमोड कर, परंतु जामिन होउं नको ।

विडा पैजंचा उचलुं नको
उणी तराजू तोलुं नको
गहाणं कुणाचें डुबवुं नको
असल्यावर भीक मागूं नको
नसल्यावर, सांगणे कशाला, गावं तुझा, भीड धरुं नको ॥२॥

उगीच निंदास्तुती कुणाची स्वहितासाठी करुं नको ।
बरी खुशामत शाहण्याची ही, मूर्खाची ती मैत्रि नको ।
कष्टाची बरि भाजिभाकरी तूपसाखरेची चोरि नको ।
आल्या अतिथा मूठभर द्याया, मागेपुढती पाहुं नको ।
दिली स्थिति देवानें तीतच मानी सुख, कधि विटुं नको ।
असल्या गांठी धनसंचय कर, सत्कार्यी व्यय हटुं नको ।
आतां तुज ही गोष्ट सांगतों, सत्कर्मा ओसरुं नको ।
सत्कीर्ती-नौबतीचा डंका गाजे मग शंकाच नको ।
सुविचारा कातरुं नको
सत्संगत अंतरुं नको
द्वैताला अनुसरुं नको
हरिभजना विस्मरुं नको
गावयास अनंतफंदीचे फटके मागे सरुं नको

~ फटका-अनंतफंदी ~

प्राचीन गीतमंजुषा - संपादक - ना. ग. जोशी या पुस्तकातून



मूल्य ₹४०/-
मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३७, अंक ४, दिवाळी २०१९

प्रेषक:
मराठी अभ्यास परिषद,
बी-५/१६, सनसिटी, सिंहगड रस्ता,
आनंदनगर, पुणे ४११ ०५१

marathi.abhyas.parishad@gmail.com

बुकपोस्ट- बुकपॅकेट-त्रैमासिक
BOOK PACKET
Containing Periodical
RNI No. Q-40048/83 । ISSN 2231-4059
Marathi Abhyas Parishad Patrika.








